


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






२६६४

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

सन १९३०

वर्ष ३रे, अंक १ला - मार्च १९३०
वर्ष ३रे, अंक २रा - जुलै १९३

अनुक्रमणिका



# अनुक्रमणिका

२६६४

वर्ष ३ रे अं. १

मार्च १९३०

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका वर्ष ३ रें (शके १८५२)

# लेखकानुक्रमणिका

महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका, वर्ष ३ रें ( शके १८५२)

# विषयानुक्रमणिका

## अभिप्राय



## ऐतिहासिक



## ग्रंथ



## चरित्र



## निबंध



## परिषद् वार्ता



## पुस्तक परीक्षण



## पोंच



## भाषिक

### शंका, चर्चा इत्यादि



### सामाजिक

# रसक्रिया

लेखकः—कै. कृष्णाजी विनायक वझे

रसक्रिया ह्यांतील मूळ शब्द रस हा झाडें वगैरेंत वाहणारा पातळ पदार्थ या अर्थाचा असून पाणी, माती, हवा व सूर्यप्रकाश या चार वस्तूंच्या संयोगानें झाडांच्या ठिकाणीं रंग, वास, रुची, स्पर्श, आकार वगैरेंत भिन्नपणा आणणाऱ्या क्रियेला रसक्रिया म्हणत असत. या रसक्रियेचें रहस्य समजलें म्हणजे माणसांना 'कामधेनु'–वाटेल ते इष्ट पदार्थ देणारा कारखाना– तयार करतां येतो. 'कामधेनु' म्हणजे एक गाय आहे असें सामान्यतः समजण्यांत येतें. परंतु तो शब्द मूळचा या अर्थाचा नाहीं हें ऋग्वेदांतील खालील वाक्यावरून उघड आहे.

तक्षन्नासत्याभ्यां परिज्मानं सुखं रथं ।
तक्षन्धेनुं कामदुघां ॥

'ऋभूंनीं अश्विनीकुमारांकरितां सुखकारक व चोहोंकडे जाणारा रथ तयार केला व इष्ट वस्तू देणारी गाय तयार केली.' या वाक्यांतील 'तक्षन्' घडून तयार केली हे शब्द जसे रथाला लावले आहेत तसेच ते कामधेनूलाहि लावले आहेत. यावरून कामधेनु हा एक कारखाना असून त्या कारखान्यांत वाटेल तेव्हां वाटेल ती वस्तु निर्माण करतां येत असे. वसिष्ठ, भरद्वाज व गौतम, यांच्या मालकीचे कारखाने होते असें पुराणांतरीं सांगितलें आहे.

पुढें रसक्रिया म्हणजे पारा व अभ्रक यांच्या संयोगानें होणाऱ्या क्रिया असा अर्थ झाला. वैद्यशास्त्रांत हे दोन जिन्नस सर्व रोगांवर चालतात असा अनुभव आला व पारा ही धातु नेहमीं पातळ असते यावरून तिला रस म्हणूं लागले व या रसाची क्रिया म्हणजे रसक्रिया असा अर्थ रूढ झाला. पाऱ्याच्या योगानें हलक्या धातूंचें सोनें करतां येतें असें ठरून 'परिस' याची कल्पना आली. लोखंडासारख्या हलक्या धातूला स्पर्श करून तिचे सोन्यासारख्या श्रेष्ठ धातूंत रूपांतर करणारी जिन्नस ती 'परीस' होय. ही कल्पना 'कामधेनू'पेक्षां कमी दर्जाची व व्यापाराच्या दृष्टीनें अर्वाचीन आहे. कामधेनु ही माणसांना लागणारे अर्थ म्हणजे भोग-वस्तु पुरविणारी होती. या भोगवस्तूंच्या अदलाबदलीपासून व्यापाराची वाढ होतां होतां सोनें ही अदलाबदलीची सर्व संमत जिन्नस ठरल्यानंतर परिसाची महती ठरली. ज्यावेळीं सोन्यानें देवघेव होत नव्हती तेव्हां परिसाची कांहींच किंमत नसणार. त्यावेळीं कामधेनुच पाहिजे.

तात्पर्य परीस, कल्पवृक्ष, कामधेनु, अमृत या ध्येयकल्पना आहेत. ही अंतिम साध्यें आहेत. तीं एकापेक्षां एक समाजांतील अलीकडचा काळ दाखवितात. पहिल्यानें खाणें हाच मुख्य भोग होता तेव्हां 'अमृत' ही श्रेष्ठ खाण्याची वस्तु होती. तिनें भूक लागत नसे इतकेंच नव्हे तर मेलेलीं माणसें जिवंत होत असत. पुढें अन्नाशिवाय दुसरे भोग निर्माण झाल्यावर अमृत मागें पडलें व कामधेनु उत्पन्न झाली. ही खाद्यपेयेंच नव्हे तर वस्त्रपात्र वगैरेहि देण्यास समर्थ होती. नंतर घरेंदारें निर्माण झाल्यावर कामधेनु मागें पडली व कल्पवृक्ष उत्पन्न झाला. हा

वृक्ष लांकडें वगैरेचीं घरें, भांडीं, कुंडीं वगैरे वस्तु देऊं लागला व समाज याहूनहि जास्त उत्क्रांत झाल्यावर सोन्यानाण्यांत व्यवहार होऊं लागले तेव्हां परीस निर्माण झाला व तो वाटेल तितकें सोनें देऊं लागला. या सोन्याच्या जोरावर वाटेल ती वस्तु (भोग) मिळवितां येते. अशी स्थिती त्याकाळीं आली होती व तीच स्थिति आजहि आहे. समाज याहि पुढें उत्क्रांत झाल्यावर काय होईल हें तूर्त कांहीं सांगतां येत नाहीं. मानससृष्टी निर्माण करतां यावी अशी आकांक्षा आज लोक बाळगतात. परंतु ही कल्पना आपण हिंदुलोकांनीं पूर्वींच घेतली असून मरीचि, विश्वामित्र वगैरेंनीं या गोष्टी केल्या आहेत.

वर सांगितल्याप्रमाणें हिंदुशास्त्रकारांनीं जरी खनिज व प्राणिज पदार्थांच्या गुणधर्मांचें पुष्कळ अवलोकन करून व अनेक अनुभव घेऊन ग्रंथ निर्माण केले होते तरी रसायन व्यापाराचें त्यांनीं सेंद्रिय व निरिंद्रिय असें वर्गीकरण केलें नव्हतें. पाश्चात्य रसज्ञलोक एकाकाळीं असें वर्गीकरण करीत. खनिज द्रव्यांच्या व्यापारांना ते निरिंद्रिय Inorganic असें म्हणत व प्राणिज जिनसांच्या व्यापाराला ते सेंद्रिय Organic असें म्हणत. Organisation सुव्यवस्थित घटना हे जीवाच्या अस्तित्वाचें द्योतक आहे असें ते समजत. परंतु जसजशी शास्त्रीय ज्ञानाची वाढ झाली तसतशी ही समजूत गेली. निरिंद्रिय समजल्या जाणाऱ्या सृष्टींत सुद्धां व्यवस्था आहे. निरनिराळ्या द्रव्यांचे स्फटिक निरनिराळ्या विशिष्ट रंग रूपांचे असतात इतकेंच नव्हे तर या स्फटिकांचा एखादा भाग मोडला तर तीं द्रव्यें नेमका तोच भाग त्याच ठिकाणीं निर्माण करतात. निरनिराळ्या परिस्थितींत खनिज द्रव्यें नेमकीं योग्य तऱ्हेनेंच वागतात असें विज्ञान शास्त्रानें सिद्ध करून आपल्या पुरता सजीव व निर्जीव हा भेद नाहींसा केला त्याचकाळीं रसायनशास्त्रानेंहि सेंद्रिय व निरिंद्रिय हा भेद योग्य नाहीं, प्राणिज जिन्नस खनिज द्रव्यांपासून उत्पन्न करतां येतात असें सिद्ध केलें आहे. तात्पर्य, सगळें जग एकाच वस्तूपासून झालेलें असल्यामुळें त्याच्या अमुक भागांत अमुक गुणांचा अभाव आहे असें नाहीं. हे गुण कमीजास्त प्रमाणांत असतील, त्यांना आपलें सामर्थ्य प्रगट करण्यास कमीजास्त वाव असेल इतकेंच. परंतु अमका गुण अमुक जिनसेंत मुळींच नाहीं असें म्हणणें व जगाचें त्या धोरणानें वर्गीकरण करणें चूक आहे असें आतां सिद्ध झालें आहे.

दोनअक्षरी शब्दांचीं जशीं पुष्कळ रूपें होत नाहींत, फार झालें तर 'खूब' याचें 'बखू' असें रूप होईल व या 'बखू'ला अर्थ नसेल तर 'खूब' हें एकच रूप भाषेंत येईल, त्याप्रमाणें खनिज द्रव्यांचे रसायन व्यापार अगदीं साधे असतात. त्यांचे घटक इतके थोडे असतात कीं त्यांचें रूपांतर व्हावयाला वावच नसतो. उदाहरणार्थ, मीठ याचे घटक फक्त दोन (१) सोडा व (२) क्लोरिन, यांत काय रूपांतर होणार व रूपांतर झालेंच नाहीं तर गुणभिन्नत्व तरी कसें येणार ? तथापि खनिज द्रव्यांत सुद्धां पिंवळा फास्फरस व तांबडा फास्फरस असे भेद व गुणभिन्नत्व आहे. थोडे घटक असले म्हणजे त्या घटकांची एक विशिष्टच वस्तु होते व तिचा रूप, रंग, रुचि वगैरे गुणांचा विस्तार मर्यादित असतो व यांचे नियम व शास्त्र ठरलेलें आहे व निराळें आहे असें वाटतें.

प्राणिज पदार्थांचे एकच घटक असले तरी अनेक रूपें व अनेक गुण असल्याचें आढळून

येतें. असें भिन्नत्व जीव निर्माण करतो असें वाटतें. सामान्यतः प्राणिज पदार्थ हे प्राणवायु, उदानवायु, व्यानवायु व कोळसा यांचे बनलेले असतात तरी त्यांचे गुणधर्म फार भिन्न असतात. उदाहरणार्थ, आसेटिक आसिड, मद्यार्क, साखर, पीठ, चरबी, तेल यांचे घटक प्राण, उदान व कोळसा हे तीनच असून त्यांचें भिन्नत्व इतकें आहे कीं हे एकाच घटकांचे असतील असा पहिल्यानें संशयसुद्धां येत नाहीं व शेवटीं पृथक्करण केल्यावर त्यांचे घटक एकच आहेत हें पाहून फार आश्चर्य वाटतें व हें असें कसें होतें याचा उलगडा प्राण्यांच्या शरीरांत जीव म्हणून एक परमेश्वरी शक्तीचा विशिष्ट अंश आहे व ती शक्ति या जिनसांना हे विशेष गुणधर्म देते असें अनुमान होतें.

वारकाईनें प्रयोग करून पाहतां अलीकडे असें आढळून आलें आहे कीं जीवाला करतां येणाऱ्या गोष्टी कांहीं सृष्टीच्या नियमांशीं विसंगत अशा नाहींत. ज्या गोष्टी जीव आपल्या शरीररूपी कारखान्यांत गुप्तपणें करतो त्याच गोष्टी प्रयोगशाळेंत सर्वांसमक्ष खनिज पदार्थांकडून आपणांस करवितां येतात असें आतां सिद्ध झालें आहे. अद्याप वाटेल ती जिन्नस आपणांस अशा रितीनें करून दाखवितां येत नाहीं. परंतु ज्या बऱ्याच गोष्टी आज करून दाखवितां येतात त्यांवरून इतर गोष्टीहि कालांतरानें एके दिवशीं करून दाखवितां येतील अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं. निदान जीव म्हणून एक मोठी खनिजपदार्थांत न सांपडणारी अद्वितीय शक्ति आहे असा जो समज होता तो जाऊन जीव ही सृष्टींत सर्वसामान्य व सर्वव्यापिशक्ति आहे इतकें म्हणण्याची आज तयारी झाली आहे. आज प्रयोगशाळेंत ज्या जिनसा तयार करतां येतात व ज्या पूर्वी केवळ प्राण्यांपासूनच मिळवाव्या लागत असत त्या म्हणजे बदामांचें कडू तेल, द्राक्षें व ऊंस यांतील साखर, नीळ, काफी, कापूर, लिंबांचें तेल, टरपेन टाईन, मूत्र, रेशीम, वगैरे होत. तात्पर्य, आज सेंद्रिय रसायनशास्त्र असें निराळें शास्त्र नसून रसायनशास्त्राचाच तो एक मोठा व उच्च वर्गाचा भाग आहे. कोळसा, गंधक व फास्फरस यांपैकीं कोणतें तरी एक अगर अनेक द्रव्यें ज्यांत आहेत त्या सर्व क्षारांना पूर्वी आपण सेंद्रिय म्हणत होतों असें आतां ठरलें आहे. विशेषतः कोळसा हा सर्व सेंद्रिय द्रव्यांचा आत्मा आहे व म्हणून कोळशाचें रसायनशास्त्र म्हणजे सेंद्रियरसायनशास्त्र असें आज समजतात. परंतु हाहि भ्रमच आहे असें म्हणावें लागेल असें वाटतें. पूर्वी पाऱ्याची किंवा सोन्याची सद्दी होती तेव्हां सोनें किंवा पारा याच्याच क्रियेला 'रसक्रिया म्हणत. आज कोळशाची सद्दी आहे. सगळी पाश्चात्य सुधारणा कोळसामय आहे म्हणून आज कोळशाचे रसायन व विज्ञानव्यापार म्हणजे प्रमुखशास्त्र असें समजलें जात आहे. यांत नवल असें कांहीं नाहीं. आगगाड्यांपासून विमानांपर्यंतच्या आजच्या सर्व गोष्टी कोळसा व त्याची संतति यांच्या जीवावर चालल्या आहेत. यावेळीं रसायनशास्त्राचा आत्मा म्हणजे कोळसा असें ठरणेंच योग्य असून तसें ठरलें आहे. सर्व रोग बरे करणारें औषध म्हणजे कोळसा, सर्व यंत्रें चालविणारा कोळसा, सर्व पदार्थ पुरविणारा कोळसा, सर्व सुधारणा करणारा व शोध लावणारा कोळसा, असें सर्वोत्तमत्व आज कोळशाला आलें आहे.

आतां सेंद्रिय व निरिंद्रिय हा भेद कसा नाहींसा झाला हें आपण थोडक्यांत पाहूं. यंत्रशास्त्राचा असा सिद्धांत आहे कीं एक विशिष्ट वेगाची शक्ति भिन्नभिन्न वस्तूंत एकाच वेळीं आघात करीत असली तर तिच्या आघातानें त्या वस्तु निरनिराळ्या निवडल्या जातात. दाणे

१

अनुक्रमणिका

सुपांत घालून घोळतांना आपण त्याच सिद्धांताचा उपयोग करीत असतों. त्यामुळें चांगले दाणे, किडके दाणे, खडे, माती, कचरा इतक्या गोष्टी आपण निरनिराळ्या काढूं शकतों. या क्षुल्लक कामापासून एकत्र जमलेल्या माणसांच्या समूहापर्यंत सर्वांची वर्गवारी या रितीनें करतां येतें. हेंच तत्व

मृगा मृगैः संगमनुव्रजंति गावश्च गोभिस्तुरगास्तुरंगैः ॥

या कविवचनांत सांगितलें आहे व रसायनशास्त्रांत याच तत्वाचा उपयोग करीत असतात.

रसायनशास्त्रांत हमेश वापरण्यांत येणाऱ्या शक्ति म्हणजे (१) पाणी व (२) उष्णता या होत. यांत पाण्याची विशिष्ट गति अखंड ठेवणें कठीण असतें. पाणी स्थितिदर्शक आहे. जिन्नस स्वस्थ ठेवणें असेल तर ती पाण्यांत ठेवतां येते. शांतीनें होणारें काम पाणी करतें. उष्णता ही गति आहे, या लाटा आहेत. यासाठीं गतीनें, चलनवलनानें करावयाची कामें आपणांस उष्णतेनें करतां येतात. उष्णतेची गति एकसारखी ठेवतां येते व ती उष्णता-मापकयंत्रानें अखंड मोजतांहि येते. यासाठीं भिन्न भिन्न रासायनिक जिनसांचें पृथक्करण करणें असेल तर विवक्षित उष्णतेचा त्या संघावर सारखा मारा केल्यानें हें काम करतां येतें. खाणींतून निघालेल्या तेलाचें याच पद्धतीनें पृथक्करण करतात. खाणींतील तेल म्हणजे अनेक जिनसांचें मिश्रण असतें व या मिश्रणांतून निरनिराळीं द्रव्यें अलग अलग करण्याच्या कामीं उष्णतेचा चांगला उपयोग होतो. तो असा.

एका काचेच्या भांड्यांत हें तेल घालून त्याच्या बुचांतून एक उष्णतामापक यंत्र त्या तेलांत खोल पर्यंत बुडविलेलें असलें तर तें त्या तेलाच्या फक्त वाफेंत राहील अशी तजवीज करतात व ही वाफ पुढें थंड करून तिला द्रवरूप येईल असें करतात. विवक्षित उष्णतेच्या वाफेचे द्रव एका ठिकाणीं अशा रितीनें ज्यांची वाफ होते अशीं सर्व द्रव्यें निरनिराळीं गोळा करतात. विवक्षित उष्णतेनेंच वाफ होणें हें एका विशिष्ट वस्तूचेंच लक्षण असतें व या प्रमाणें ती विशिष्ट वस्तु एकत्र गोळा करतां येते. याच्या उलट एका विवक्षित उष्णतेंतच ती जिन्नस घट्ट होते. हेंहि एका विशिष्ट वस्तूंचेंच लक्षण असतें व याचाहि निरनिराळया वस्तु अलग अलग करण्याच्या कामीं उपयोग होतो ती कृति अशीः—

एक काचेच्या भांड्यांत विवक्षित उष्णतेनें उकळणारा पातळ पदार्थ घालून त्यांत एक उष्णतामापक यंत्र व एक तें मिश्रण घातलेली नळी बुचांतून आंत घालतात. विशिष्ट उष्णतेनें एक जिन्नस पातळ होते ती काढून घेतात, मग दुसरी पातळ होते ती काढून घेतात. याप्रमाणें सर्व वस्तु निरनिराळया करतां येतात. याच्या उलट पातळ जिन्नस घेऊन ती थंड करून घट्ट झाली ती निराळी काढली, मग आणखी थंड केल्यावर दुसरी घट्ट झाली ती निराळी काढली, असेंहि करतां येईल; परंतु पातळ झालेली जिन्नस ओतून घेणें जसें सोपें आहे तसें घट्ट झालेली जिन्नस काढून घेणें सोपें नाहीं. यासाठीं पहिल्या पद्धतीनेंच पृथक्करण बहुशः करतात.

पाणी हें विवक्षित उष्णतेलाच उकळतें हें आपणास ठाऊक आहे. त्यांत थोडें मीठ घातलें तर तें लवकर उकळतें. व साखर घातली तर उशीरां उकळतें. बर्फांत मीठ घातलें तर बर्फाचें पाणी होतें व साखर घातली तर बर्फाचें लवकर पाणी होत नाहीं. याप्रमाणें दोन वस्तूंत

कमीजास्त प्रेम असेल त्याप्रमाणें त्यांचें रूपांतर होतें. पाण्यांत मीठ गेलें म्हणजे तें पाण्याला लवकर वाफ होण्यास सांगतें व साखर त्याला " थांबरे होशील वाफ, जरा थांब " असें म्हणते म्हणून लवकर वाफ होत नाहीं. पापडखाराचा साखरेसारखाच उपयोग होतो. याप्रमाणें पाण्याच्या उकळण्याच्या उष्णतेवरून त्यांत किती मीठ किंवा साखर अगर पापडखार आहे हेंहि सांगतां येतें. याच ज्ञानाचा उपयोग वस्तूंच्या पृथक्करणांत करतात. तात्पर्य, विवक्षित उष्णतेनें वाफ होणारी किंवा घन होणारी जिन्नस एकजिनसीच असते असें ठरलें आहे.

मिश्रणांतून घटक द्रव्यें निराळीं काढल्यावर पुढचें काम म्हणजे या द्रव्यांचीं रासायनिक घटक द्रव्यें किंवा सारणी ठरविणें हें होय. हें काम करण्याच्या पद्धतींत ती वस्तु मोजलेल्या प्राणवायूंत जाळणें व त्यापासून उत्पन्न होणारीं द्रव्यें मोजणें हें होय. ती कृति अशी.

एका नळींत ती वस्तु घालून व ती तापवून तिजवरून प्राणवायूचा प्रवाह सोडावा म्हणजे त्या वस्तूच्या घटकांचा व प्राणवायूचा संयोग होतो. उदानवायूचें पाणी होतें, कोळशाचा हारिमाणवायू होतो. पाणी चुन्याच्या खारांत व हारिमाणवायु सोड्याच्या किंवा पोट्याशच्या निवळींत धरतात. या वाढलेल्या व कमी झालेल्या वजनावरून हिशोब करून घटक परिमाणूंची संख्या सांपडते. उदाहरणार्थ समजा कीं १४२ गुंजा तेलापासून १९८ गुंजा पाणी व ४४० हारिमाण झाला तर पाण्यांत $\frac{१}{९}$ भाग उदानवायु असतो. या मानानें १०८ गुंजा पाण्यांत २२ गुंजा उदान वायु आहे व हारिमाणवायूंत $\frac{३}{११}$ कोळसा असतो त्या मानानें ४४० गुंजांत १२० गुंजा आहे व घटक द्रव्यांचें प्रमाण $\frac{२२}{९} : \frac{१२०}{१२}$ असें बसतें. उदानवायूच्या परमाणूचें वजन एक असलें, तर कोळशाच्या परमाणूचें वजन १२ असतें. यावरून २२ गुंजा उदानवायूंत २२ परमाणू असले तर १२० गुंजा कोळशांत १० परमाणू कोळशाचे असतात. यावरून सदर तेलांत कोळशाच्या १० परमाणूंस उदानवायूचे २२ परमाणू आहेत असें सापेक्ष माप समजतें.

यानंतर या परमाणूंचें नक्की माप काढावें लागतें व तें वायुरूपांच्या वजनांवरून काढतात. वायुरूपांत सगळे परमाणू स्वतंत्र असल्यामुळें एक भांडेंभर वायूंत प्रत्येक प्रकाराचे तितकेच परमाणु मावतात असा सिद्धांत आहे व याप्रमाणें कोणत्याहि जिनसेची वाफ करून तिच्या विवक्षित मापाचें वजन केलें म्हणजे तिच्या परमाणूचें वजन समजतें व त्यावरून परमाणूचे घटक काढतां येतात. याप्रमाणें वरील तेलाचे घटक काढले तर खालीलप्रमाणें एक यादच तयार होते.

| नांव | घटक | उकळणें | थिजणें | विशिष्ट गुरुत्व |
|---|---|---|---|---|
| सायमोजेन | क. उ ४ ते क ४ उ १० | ० | | ०–४१५ |
| व्हिगोल्हेन | क ४ उ १० ते क ५ उ १२ | १८ | | ०–६३३ |
| पेट्रोल ईथर | क ५ उ १२ ते क ६ उ १४ | ७० | | ०–६७७ |
| पेट्रोल नाप्था | क ६ उ १४ ते क ८ उ १८ | ९० | | ०–७१८ |
| पेट्रोल बेंझीन | क ८ उ १८ ते क १९ उ २० | १२० | | ०–७३३ |
| केरोसीन | क ९ उ २० ते क १७ उ ३६ | १५० | २२ | ०–७७७ |
| ल्युब्रीकेटिंग | क १७ उ ३६ ते क २० उ ४२ | २०० | ३७ | ०–७७८ |
| व्हासेलीन | क २० उ ४२ ते क २२ उ ४६ | २४० | ४४ | |
| पाराफिन | क २२ उ ४६ ते क ३२ उ ६६ | | ६५ | |

हे परमाणू किती संकीर्ण असतात हें खालील उदाहरणांवरून लक्षांत येईल व यामुळें यांचीं अनेक रूपें व अनेक भिन्न भिन्न गुण यांत दृष्टीस पडतात हें साहजीकच आहे.

उसाची साखर क १२ उ २२ प्रा. ११
स्टीरिन क ५७ उ ११० प्रा. ६
सपीठ (सत्व) क १२०० उ २००० प्रा. १०००

एकाच घटकावयवाचीं अनंत रूपें होणें अंकपाशगणितानुसार साहजीकच आहे. तीन अक्षरी शब्द घेतला तर त्याचींच पांचसहा रूपें सहज होतात. 'खबर याची खवर, खरब, रखब, रबख, बखर, बरख अशीं सहा रूपें होऊं शकतात. मग क. ८ उ. १२ प्रा. ४ या घटकाची निरनिराळीं ६६ स्वरूपें दिसलीं तर त्यांत आश्चर्य काय इ.

तात्पर्य, सेंद्रिय द्रव्यें ही निरिंद्रिय द्रव्यांपेक्षां जास्त संकीर्ण, निरनिराळे परिणाम होणारीं, अनेकरूपें असणारीं व फार चंचल अशीं असतात. यांच्या संकीर्णतेमुळें कोणत्या जिनसेचा परिस्थित्यनुरूप यांच्यावर काय परिणाम होईल हें निश्चित सांगणें अवघड पडतें. जेथें दहावीस परमाणू एकत्र येतात तेथें लांबींत, रुंदींत व उंचींत यांची रचना निरनिराळी होते. यांची लांबीरुंदीची किंवा क्षेत्रांची रचना त्यांचा आकार व उष्णतेचा त्यांवर होणारा परिणाम यांवरून कळते व त्यांच्या उंचींतील रचनेंतील फेरफार त्यांतून जाणाऱ्या सूर्य किरणांवरून कळतात निरनिराळ्या साखरांतून जाणाऱ्या सूर्य किरणांचें निरनिराळें पृथक्करण होतें. कांहीं साखरांतून किरणें उजवीकडे फांकतात तर कांहींतून डावीकडे फांकतात. कांहींतून तीं थोडाच कोन फांकतात तर कांहींतून जास्त कोन फांकतात व याप्रमाणें त्यांचे रंग, त्यांची चमक, त्यांचे स्फटीक, त्यांची गोडी, त्यांचें पाण्यांत विरण्याचें प्रमाण, गंधक वगैरे आम्लांचे त्यावर होणारे परिणाम वगैरे गोष्टींत भिन्नपणा व विविधता उत्पन्न होते.

सारांश, निरिंद्रिय द्रव्यें साधीं असतात. त्यांची रचना साधी, गूण थोडे, क्रिया निश्चित, अशीं असतात तर सेंद्रिय द्रव्यांचे घटक फार संकीर्ण व मोठे, त्यांची रचना विविध, गूण पुष्कळ प्रकारचे, क्रियांत सूक्ष्म फरकांमुळें तफावत पडत असल्यानें अनिश्चित अशी असते. जिवंत प्राण्यांच्या शरीरांत तर यांचे परिणाम फारच विलक्षण होतात. इतर परमाणूंना हे आपल्याकडे वळवून शरीररूपी राज्यांत फितूर करून फारच गोंधळ उडवितात.

संशोधकांना, अभ्यासकांना, व नवीन रचना करूं इच्छिणारांना या संकीर्णतेचा फार उपयोग होतो. एकाच वस्तूचा जादूच्या खेळाप्रमाणें अनेक प्रकारचा विलक्षण देखावा त्यांना उत्पन्न करतां येतो. मिळेल त्या जिनसेचा पाहिजे ती जिन्नस उत्पन्न करण्यांत उपयोग करतां येतो. हा या संकीर्णतेचा मोठा उपयोग आहे. सबब या शास्त्राचा अभ्यास जरूर झाला पाहिजे.

रसायनशास्त्राचा अभ्यास हा एक मोठा मनोरंजक, फार उपयोगी असा अभ्यास आहे. ही एक कामधेनुच आहे. तरी प्रयोगशाळेंत कृत्रिम बनविलेल्या मोठमोठ्या जिनसा व जिवंत असलेले अतिसूक्ष्म प्राणी यांत मोठा भेद उरतोच व तो भेद म्हणजे संततिनिर्माण व स्वाधीनता हा होय. कृत्रिम जिनसांना आपलें स्वतःचें पोषण करून, वाढून, संतति निर्माण करतां येत नाहीं. हें काम त्यांच्यासाठीं माणसांना करावें लागतें. परमेश्वरी सृष्टी व माणसांची सृष्टि यांत हा भेद नेहमींच रहातो. माणसें यंत्रें करतात; परंतु या यंत्रांना स्वतःचें पोषण करून जगतां येत नाहीं. माणसें दुर्बिणी करतात; परंतु या दुर्बिणींना आपोआप वाटेल तिकडे फिरतां येत नाहीं, आपला केंद्र मिळवितां येत नाहीं व नवीन दुर्बिणी करतां येत नाहींत. तसेंच माणसें सेंद्रिय द्रव्यें निर्माण करतात; परंतु या द्रव्यांना नवीन द्रव्यें निर्माण करतां येत नाहींत. परंतु सृष्टींतील अतिसूक्ष्म जंतु वाढत असतो, व्यक्तिशः मोठा होत असतो व संतति निर्माण करून आपली जात वाढवीत असतो तसें या कृत्रिम द्रव्यांना करतां येत नाहीं.

# प्राकृत काव्यें व गाथासप्तशती

## प्राकृत काव्यें

( लेखकः—प्र. धों. कानिटकर )

संस्कृत ही मुख्य भाषा असून तिच्या विकारापासून उद्भूत झालेल्या सर्व भाषांना प्राकृत ही संज्ञा आहे. पाली ही पहिली प्राकृत भाषा असून तदनंतर शौरसेनी, मागधी, पैशाची व महाराष्ट्री या चार भाषा अस्तित्वांत आल्या. इसवीसनापूर्वी पहिल्या शतकांत महाराष्ट्री भाषेचा अंमल होता, व तत्कालीन शिलालेख महाराष्ट्री भाषेंत आहेत. पालीशिवाय चार प्राकृत भाषांचें व्याकरण वररुचिकात्यायनानें लिहिलें असून, तो इ. सनापूर्वी ३५० चे सुमारास होऊन गेला. या चार प्राकृत भाषांपासून चार अपभ्रंश भाषा झाल्या व त्यांपैकीं महाराष्ट्री अपभ्रंशापासून, जुनाट मराठी (ज्ञानेश्वरकालीन) उगम पावली अशी परम्परा आहे. वररुचीनें चार प्राकृत भाषांचें व्याकरण लिहिल्याचें सांगितलें आहे. त्यांत विशेष भाग महाराष्ट्रीभाषेसंबंधी असून इतर तीन भाषांवर त्रोटक सूत्रें दिलीं आहेत व बहुतेक सर्व बाबतींत महाराष्ट्रीवर हवाला दिला आहे.

वररुचीनंतर महत्वाचा प्राकृत व्याकरणाचा ग्रंथ हेमचंद्रानें इ. सनाच्या २१ व्या शतकांत लिहिला आहे; त्यांत त्यानें वररुचीच्या ४ प्राकृत भाषांचा विचार केला असून शिवाय अपभ्रंश व चूलिकापैशाची या दोन भाषांबद्दल स्वतंत्र विवरण केलें आहे. हेमचंद्राशिवाय कोणाचेंहि अपभ्रंश भाषेचें व्याकरण उपलब्ध नाहीं. कै० राजवाडे यांनीं यांसंबंधी सोपपत्तिक विवेचन ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत व ज्ञानेश्वरीच्या व्याकरणांत केलें आहे. हेमचंद्रानें ज्या सहा प्राकृतांचा उल्लेख केला आहे, त्याशिवाय प्रांतवार व जातिविशिष्ट अनेक प्राकृत भाषा उद्भूत झाल्या व त्यांपासूनच निरनिराळ्या प्रांतांतील बोलण्याच्या भाषा प्रचलित झाल्या आहेत. ( See the Wilson Philosophical Lectures of Dr. Bhandarkar, Dr. Gune and Mr. H. N. Apte and the " Linguistic Survey of India " by Dr. Grierson). मृच्छकटिक नाटकांत अनेक प्राकृत भाषांचा उपयोग केला आहे; तसेंच कै० राजवाडे यांनीं प्रकाशित केलेल्या "राधामाधवविलासचंपूंत" हि १२ प्राकृत भाषांचा सोदाहरण उल्लेख केला आहे.

मराठीचा व प्राकृताचा याप्रमाणें निकट संबंध असल्यामुळें प्राकृत काव्यें हें अत्यंत महत्त्वाचें वाङ्मय होय. प्राकृतांत लिहिलेलीं तीन काव्यें उपलब्ध आहेत तीं:—

( १ ) हालसातवाहनाची गाथासप्तशती;
( २ ) सेतुबन्ध काव्य ऊर्फ दहमुहवहो;
( ३ ) गउडवहो.

( १ ) गाथासप्तशती हालाच्या प्रेरणेनें झाली; किंवा कोणी कवीनें तयार करून ती हालास अर्पण केली असावी असें विद्वानांचें मत आहे. सप्तशतीचा काळ इ. सनाचें पहिलें अगर दुसरें शतक असावें. सप्तशती शुद्ध व सोप्या महाराष्ट्री भाषेंत लिहिली आहे; याबद्दलचें विस्तारपूर्वक विवेचन याच निबंधांत पुढें होणार आहे.

( २ ) सेतुबन्ध काव्य काश्मीर देशाचा राजा प्रवरसेन यानें कालिदास कवीकडून करविलें असें दिसतें.

अनुक्रमणिका

काश्मीर देशांत पहिला प्रवरसेन इ. सनाच्या ४ थ्या शतकांत होऊन गेला व दुसरा प्रवरसेन इ. सनाच्या ५ व्या शतकांत होऊन गेला, व त्याच्याच प्रेरणेनें सेतुबंध काव्य कालिदासानें रचिलें असावें. ( Indian Antiquary Vol. XII page 243 ). सेतुबन्ध काव्याचा उल्लेख दण्डी व बाण या दोन्ही कवींनीं केला आहे. हे दोन्ही कवी समकालीन असून त्यांचा काल इ. स. ५५० ते ६५० हा ठरलेला आहे. डॉ. भाण्डारकर यांचेंहि तसेंच मत आहेः—

" Kālidāsa may, therefore, be referred to that period of Sanskrit literature in which the nine gems flourished, and which has been placed by Dr. Kern in the first half of the sixth century. The Mahārāṣṭrī dialect, therefore, in which कालिदास wrote the सेतुबन्ध and the Prakrit verses in his plays must have undergone a course of cultivation for about 2 or 3 centuries earlier. "

दण्डी कवीनें फक्त " सेतुबन्ध " काव्याचा उल्लेख खालीं दिलेल्या श्लोकांत केला आहेः—

महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः।
सागरः सूक्तिरत्नानां सेतुबन्धादि यन्मयम् ॥ ( काव्यादर्श )

बाणभट्टानें हर्षचरिताच्या प्रस्तावनेंत प्रवरसेन व कालिदास या दोघांचे उल्लेख केले आहेतः—

कीर्तिः प्रवरसेनस्य प्रयाता कुमुदोज्वला।
सागरस्य परं पारं कपिसेनेव सेतुना ॥
निर्गतासु न वा कस्य कालिदासस्य सूक्तिषु।
प्रीतिर्मधुरसान्द्रासु मञ्जरीष्विव जायते ॥

सेतुबन्धाच्या प्रत्येक आश्वासकाच्या शेवटीं प्रवरसेन व कालिदास यांचे उल्लेख आहेतः—

इअ सिरिपवरसेण विरइए कालिदासकए.........

( इति श्रीप्रवरसेनविरचिते कालिदासकृते )

( फक्त १।२ या आश्वासकांचे शेवटीं " कालिदासकृतें " हें विशेषण नाहीं ). या काव्याला वाली-वधापासून प्रारंभ होऊन सीताशुद्धी, सेतुबन्ध व रावणवध हे रामायणांतील विषय क्रमानें वर्णिले असून, सीतेला अग्निशुद्ध करून भरत-भेटी-करतां राम अयोध्येला परत येण्यास निघाले इतका कथाभाग काव्यांत आला आहे.

गृहीत्वा जनकतनयां कांचनयष्टिमिव हुतवहे विशुद्धाम्।
प्राप्तः पुरीं रघुपतिः कर्तुं भरतस्य सफलमनुरागम् ॥ आश्वासक १५।९४

सेतुबन्ध काव्यावर (१) कुलनाथ (२) रामदास (३) श्रीकृष्ण या तिघांनीं टीका लिहिल्या आहेत. काव्यमालेंत ( क्रमांक ४७ ) प्रसिद्ध झालेल्या सेतुबन्ध काव्यावर रामदासाची टीका दिली आहे. हा रामदास अकबर बादशहाचा समकालीन असून, इ. सन १५९५ सालीं त्यानें टीका लिहिली असा काव्याच्या शेवटीं श्लोक आहे. हें काव्य " स्कन्धक " नांवाच्या प्राकृत छंदांत लिहिलें आहे. स्कन्धकाचें लक्षण पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

चउमत्ता अट्ठगणा पुव्वद्धे उत्तरद्ध होइ सरूआ।
सो खन्धआ विआणह पिंगल पभणेइ मुद्धि बहुसंभेआ ॥

छाया

चतुर्मात्रा अष्टगणाः पूर्वार्धे उत्तरार्धे भवन्ति सरूपाः।
तं स्कन्धकं विजानीत पिंगलः प्रभणति मुग्धे बहुसंभेदम् ॥

हा छन्द संस्कृत काव्यनाटकांत आढळत नाहीं. या काव्यांत ८ अक्षरांपर्यंत यमकें साधिलीं आहेत. काव्यांत देशी शब्द आहेत व वररुचीनें दिल्यापेक्षां धात्वादेशहि जास्त आहेत.

## गउडवहो

हें काव्य कै. शं. पां. पंडित यांनीं Bombay Sanskrit Series ( No. XXXIV )मध्यें इ. स. १८८७ सालीं प्रसिद्ध केलें आहे. या काव्याचा कर्ता वाक्पतिराज हा असून त्याचा काळ के० पंडित यांच्या मतें इ. स. ६६० ते ७१० हा होय. हा कवि कान्यकुब्ज देशाचा राजा यशोवर्मा याच्या दरबारीं होता. यशोवर्म्याचा काळ इ. स. ६७५ ते ७१० आहे. भवभूति हाहि यशोवर्म्याच्या राजदरबारीं होता. यशोवर्म्याचा काळ इ. स. ६७५ ते ७१० आहे. भवभूति हाहि यशोवर्म्याच्या राजदरबारीं असून वाक्पतिराज त्याचा शिष्य होता. यशोवर्म्याच्या मृत्यूनंतर गौडवध काव्य रचिलें असावें व त्याचा अंदाजानें काळ इ. स. ७०० ते ७२५ असावा असें के. पंडित म्हणतात. या काव्याचें वृत्त गाथा आहे. हें काव्य अपुरें असावें असें के. पंडित म्हणतात. कारण गौडदेशच्या राजाच्या वधाचा अगदीं त्रोटक उल्लेख काव्यांत आढळतो. किंबहुना उपलब्ध काव्य हें मुख्य काव्याची प्रस्तावना असावी असें दिसतें. वाक्पतिराजानें पुढें दिलेल्या पूर्व कवींचा उल्लेख केला आहे:-श्रीकमलायुध, भवभूति, भास, ज्वलनमित्र, कुन्तीदेव, रघुकार ( कालिदास ), सुबन्धु ( वासवदत्ता-कर्ता ), व हरिचन्द्र ( गाथा ७९७-८०४ पहा ). गौडवधानंतर यशोवर्मा दिग्विजयार्थ निघाला व चारी दिशांकडे असणाऱ्या राजांना जिंकून त्यानें करभार घेतला. यांत बहुतेक सर्व हिंदुस्थानची माहिती आली आहे. या काव्यासंबंधीं के. शं. पां. पंडित यांचा अभिप्राय पुढें दिल्याप्रमाणें आहे:-

" Prakrit poetry rightly boasts of certain charms which are peculiarly its own. It possesses a softness and sweetness which comes nearer home to us than the artificial adornments in Sanskrit......Accordingly, we find much less conventionalism, less common-place verses, less ready-at-hand set phrases, set ideas and set sentiments to suit set circumstances in their poetry than in Sanskrit compositions or the corresponding class of writers. ( Intro. p. 51 ).

The style of वाक्पति is highly cultivated, and very pregnant but often presents difficulties to an early Prakrit student, which would at first discourage him.

Though learned, however, वाक्पति is not pedantic, indeed like his fellow Prakrit poets and unlike his Sanskrit confreres, he is free from puns and plays upon words and from analogies or similes drawn from grammatical or dilectical quibbles. He chiefly delights in two figures of speech, the simile ( उपमा ) and उत्प्रेक्षा. The partiality for long compounds is a vice of the age to which he belonged.......( Intro : page 54 ).

I sincerely believe वाक्पति is a poet who ought not to lie unnoticed. His originality and his lively political imagination and

his very terse style entitle him to the attention of general readers to say nothing of the historical merit of his work, and the philological value attaching to his language. "

येणेंप्रमाणें तिन्ही प्राकृत काव्यांची सर्वसाधारण माहिती आहे.

देशांतील चालीरीती, व्यापारधंदे, राज्यव्यवस्था, सामाजिक संबंध वगैरे बाबतींत प्राकृत काव्यांत उपयुक्त ऐतिहासिक माहिती सांपडते; याशिवाय मराठी भाषेची वाढ कोणत्या परंपरेनें होत आली आहे त्याचा खरा इतिहास प्राकृत काव्यांवरून समजतो. जुनाट मराठी भाषेंतील व्याकरण शब्दार्थ व व्युत्पत्ति समजण्यास प्राकृत काव्यांचा अत्यंत उपयोग आहे. मराठी भाषेंत जे असंख्य धातु आहेत त्यांपैकीं कांहीं जसेच्या तसेच मराठींत आलेले पाणिनीय धातू आहेत व कांहीं प्राकृत भाषेंतील धात्वादेश आहेत. बंगालच्या एशिआटिक सोसायटीनें Sir George Grierson यांनीं तयार केलेलें " प्राकृत धात्वादेश " हें पुस्तक १९२४ इ. सालीं प्रसिद्ध केलें आहे; त्यांत हेमचंद्र, वररुचि, क्रमादीश्वर, रामशर्मन् ( तर्कवागीश ) व मार्कण्डेय या प्राकृत वैयाकरणांचे धात्वादेश दिले आहेत ते जिज्ञासूंनीं पहावे. मूळ धातूचें प्राकृत व्याकरणाचे नियमाप्रमाणें जें प्राकृतरूप सिद्ध होतें, त्यावरून मूळ धातूची व त्यामुळें अर्थाची यथार्थ कल्पना करितां येते, उदा० याति = जाइ, दृश्यते = दीसइ, कथयति = कहइ; परंतु मूळ धातूला कोणतीहि विकृति न होतां जे धात्वादेश प्राकृतांत येतात ते मूळ धातूपासून सर्वस्वीं भिन्न असतात; यामुळें कोणत्या धातूचा कोणता आदेश आहे याचें ज्ञान झाल्यावांचून आदेशाचा अर्थबोध होत नाहीं. ही अडचण प्राकृत काव्यांच्या अभ्यासानें बऱ्याच अंशीं दूर होते. अशा प्रकारच्या आदेशांचीं कांहीं उदाहरणें पुढें देतोंः—

| संस्कृत धातू | आदेश | मराठी धातू |
|---|---|---|
| मस्ज् | बुड्ड | बुडणें |
| स्पृश | छिव | शिवणें |
| आकृष् | आछुड | आखुडणें, (निरी आखुडली = ओढली) |
| निर्वाति | विज्झाइ | विझतो ( दिवा. ) |
| परिधृ | पहिर | पेहेरणें ( कपडे ) |
| भ्रंशु | चुक्क | चुकणें. |
| स्था (तिष्ठति) चिष्टदि चिट्ठइ थक्कइ ठाअइ, ठाइ [ हेमचंद्र ] | | तिष्टत राहणें, थकणें, ठाकणें |

जो सर्वां भूतांचे ठाईं = यः सर्व भूतेषु तिष्ठति। ठाअइ यापासून 'ठेला' हें मराठी क्रियापद झालें आहेः—तो उभा ठेला.

## देशी शब्द

प्राकृत काव्यांत टीकाकार जे देशी शब्द देतात ते सर्वांत जुने मराठी शब्द आहेत. हे शब्द संस्कृतोद्भव नाहींत. संस्कृत व प्राकृत याशिवाय देशी म्हणून एक स्वतंत्र भाषा होती. महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेंत डॉ. वा. गो. परांजपे हे खंडशः भाण्डीरभाषाव्याकरण प्रसिद्ध करीत आहेत तशा प्रकारचें देशी भाषेचें व्याकरण असावें असें वाटतें. देशीनाममाला नांवाचा हेमचंद्रानें एक देशीशब्दांचा कोश तयार केला आहे त्यांत प्राकृत काव्यांतील देशीशब्द ग्रथित केले आहेत; डोळा, डोकें, चिखल, अडाणी, खळ ( धान्यमर्दनस्थान ) हे देशी शब्द आहेत.

अशा प्रकारें प्राकृत काव्यांची उपयुक्तता आहे. गाथासप्तशती हें सर्वांत जुनें किंबहुना अगदीं पहिलें काव्य आहे, त्याबद्दल सविस्तर विवेचन आतां होईल.

---

# गाथासप्तशती

( लेखकः—प्र. धों. कानिटकर )

अविनाशिनमग्राम्यमकरोत्सातवाहनः।
विशुद्धजातिभिः कोषं रत्नैरिव सुभाषितैः ॥ बाणकृत हर्षचरित
जगत्यां ग्रथिता गाथा सातवाहनभूभुजा ।
व्यधुर्धृतेस्तु विस्तारमहो चित्रपरम्परा ॥ राजशेखर सूक्तिमुक्तावली.
सत्तसताइं कइवच्छलेण कोडीअ मज्झआरम्मि ।
हालेण विरइआइं सालंकाराणँ गाहाणम् ॥ (गा. स. १।३)
एसो कविणामाङ्किअगाहापडिवद्धवड्ढिआ आमो ।
सत्तसओ समत्तो सालाहणविरद्धओ कोसो ॥

गाथासप्तशती हा ग्रंथ महाराष्ट्री प्राकृत भाषेंत लिहिलेला सातशें ग्रंथांचा संग्रह आहे. त्याचे सात भाग असून, प्रत्येक भागांत शंभर गाथा आहेत. या गाथा एकाच कवीनें केलेल्या नसून, अनेक कवी व कवयित्रींच्या ग्रंथांतून निवड करून, हा संग्रह हालसातवाहन नांवाच्या आंध्रभृत्य राजानें संकलित केला आहे. काव्यमालेंत प्रसिद्ध झालेल्या गाथा-सप्तशतीच्या निर्णयसागरी प्रतींत गाथांची अनुक्रमणिका दिली असून कांहीं गाथांच्या कर्त्यांचीहि नांवें दिलीं आहेत. वास्तविक प्रत्येक गाथा कोणत्या कवीनें केली आहे हें मूळ प्रतींत असलें पाहिजे; कारण हालराजा या संग्रहास कविनामाङ्कित गाथाकोष असें नांव देतो. उपलब्ध असलेल्या कर्त्यांच्या नांवांत आठ कवयित्री आहेत व त्यांच्या १३ गाथा संग्रहित केल्या आहेत त्या खालील प्रमाणें:—

| कवयित्री | शतक | गाथानुक्रम |
|---|---|---|
| १ रेवा | १ | ... ८७।९० |
| २ प्रहता ... | १ | ... ८६ |
| ३ वृद्धावधि ... | १ | ... ७० |
| ४ माधवी | १ | ... ९१ |
| ५ रोधा ... | २ | ... ६३ |
| ६ असुलब्धि ... | २ | ... ७७।७८ |
| ७ अनुलक्ष्मी ... | ३ | २८।६३।७४।७६ |
| ८ शशिप्रभा ... ... | ४ ... | ... ४ |

खुद्द हालाच्या नांवावर पन्नास गाथा आहेत. गाथांचा परस्पर संबंध नाहीं; त्यांत विशिष्ट विषय अगर कथानक नाहीं. बहुतेक गाथा शृंगाररसप्रधान आहेत. गाथांचें वर्गीकरण किंवा शतकांचा क्रम, संग्रहकारानें अशोकवनिका न्यायानें केल्याचें दिसतें. राजशेखराची सूक्तिमुक्तावली किंवा वल्लभदेवाची सुभाषितावली सप्तशतीच्या पद्धतीवर रचलेली आहे. गाथासप्तशतीच्या काळीं, शौरसेनी, मागधी व पैशाची या भाषांचा अंमल जवळ जवळ नष्ट झाला होता व महाराष्ट्री प्राकृत हीच प्रचलित भाषा होती. सर्व प्राकृत भाषांमध्यें महाराष्ट्री श्रेष्ठ दर्जाची होती असें दण्डींचें मत आहे:—

महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः॥



अनुक्रमणिका

गाथासप्तशतीवर पीतांबरदेव, साधारणदेव, कुलबालदेव व गंगाधरभट्ट या चार विद्वानांनीं टीका लिहिल्या आहेत. निर्णयसागरी प्रतींत गंगाधरभट्टाची भावलेशप्रकाशिका टीका दिली आहे; कांहीं ठिकाणीं कुलबालदेवानें दिलेले देशी शब्दांचे अर्थ टिप्पणींत दिले आहेत. हे दोन टीकाकार कोणत्या काळीं कोणत्या देशांत होते त्याचा तपास लागत नाहीं असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. ( टीकाकर्त्रोर्देशकालौ चानिश्चिताविव । )

२ गंगाधरभट्टाच्या टीकेंत खालीं दिलेल्या ग्रंथांचा उल्लेख येतो:—(१) वात्स्यायनाचें कामशास्त्र; (२) अमरकोश; (३) देशीकोश; (४) मातृगुप्ताचार्य; (५) हारावलीकोश; (६) मेदिनीकोश; (७) हेमचंद्र; (८) प्राकृतपिंगल, (९) काव्यप्रकाश, (१०) साहित्यदर्पण. टीकेंत जे शब्द देशी म्हणून दिले आहेत, त्यांपैकीं बरेच शब्द हारावली, मेदिनी व आपटे यांच्या संस्कृत कोशांत संस्कृत म्हणून दिले आहेत. टीकेंत उल्लेख केलेला देशीकोश कोणता तें समजत नाहीं. कारण ज्ञानकोशांत संस्कृत कोशांची जी माहिती दिली आहे, त्यांत देशीकोशाबद्दल माहिती नाहीं. हाल हा सप्तशतीला कविनामांकित गाथाकोश असें अभिधान देतो; व बाणभट्टानेंहि तसाच उल्लेख केल्याचें प्रारंभींच्या श्लोकावरून दिसतें. हा गाथाकोश स्वतः हालराजानें तयार करविला किंवा त्याच्या पदरच्या कोणी कवीनें तो तयार करुन हालास अर्पण केला असावा असें विद्वानांचें मत आहे, त्यास आधार म्हणून खालील श्लोक प्रस्तावनेंत दिला आहे.

हालेनोत्तमपूजया कविवृषः श्रीपालितो लालितः
ख्यातिं कामपि कालिदासकवयो नीताः शकारातिना ॥
श्रीहर्षो विततार गद्यकवये बाणाय वाणीफलम् ।
सद्यः सत्क्रिययाभिनन्दमपि च श्रीहारवर्षोऽग्रहीत् ॥

या श्लोकावरून श्रीपालित कवीनें धन मिळविण्याच्या हेतूनें हालाच्या नांवानें गाथांचा संग्रह तयार केला असावा असें अनुमान निघणें शक्य आहे. डॉ. भाण्डारकर यांचा अभिप्राय पुढें दिल्याप्रमाणें आहे:—

" There is, it will be observed in the list of the आंध्रभृत्य princess, one of the names is हाल, who probably was either the author of the work, or to whom it was dedica'ed by a court poet.
(Early history of the Deccan.)

कसेंहि मानलें तरी त्यामुळें हालाची योग्यता कमी ठरत नाहीं. हाल स्वतः कवी असून त्याला प्राकृतादि पांच भाषा अवगत होत्या व कवीविषयीं त्याला फार आदर असे; संस्कृत जरी देवभाषा होती तरी प्राकृताबद्दल हालराजास फार अभिमान वाटत असे. ( मऱ्हाटी भाषेबद्दल श्रीज्ञानदेव व एकनाथ यांना असाच अभिमान होता.) हाल म्हणतो:—

अमिअं पाअडकव्वं पढिउं सोउं अ जे ण आणन्ति ।
कामस्स सत्ततन्तिं कुणंति ते कहँ ण लज्जन्ति ॥ श १।२

छाया

अमृतं प्राकृतकाव्यं पठितुं श्रोतुं च ये न जानन्ति ।
कामस्य तत्त्वचिन्तां कुर्वन्ति ते कथं न लज्जन्ते ॥

यामुळें गाथासप्तशती याच्याच प्रेरणेनें झाली असली पाहिजे असें मानण्यास शंका वाटत नाहीं.

### सातवाहन ऊर्फ आंध्रभृत्य राजे

(३) या राजवंशाची माहिती खालीं दिलेल्या साधनावरून उपलब्ध होते:—

(अ) वायु, मत्स्य, विष्णु व भागवत हीं पुराणें;
(आ) बृहत्कथा (पैशाची भाषेंत लिहिलेली);
(इ) शिलालेख;
(ई) टॉलेमीचे ग्रंथ.

डॉ. भाण्डारकर यांनीं Early history of the Deccan या निबंधांत वरील साधनांचें परीक्षण केलें असून वायुपुराणांत आंध्रभृत्य राजांबद्दल दिलेली माहिती, शिलालेख व टॉलीमीचे ग्रंथांशीं मिळत आहे असा अभिप्राय दिला आहे.

पुराणांत दिलेल्या वंशावळी अविश्वसनीय मानण्याकडे यूरोपीय विद्वानांची प्रवृत्ति होती; परंतु अलीकडे ती भावना पालटली आहे.

गाथासप्तशतीचा कर्ता हालसातवाहन यांची भरपूर माहिती गुणाढ्यानें लिहिलेल्या (पैशाची भाषेंत) बृहत्कथेंत होती असें बृहत्कथेचें संस्कृत रुपांतर–कथासरित्सागर–पाहिलें असतां दिसतें. मूळ बृहत्कथा पैशाची भाषेंत होती ही गोष्ट दण्डीनें नमूद करून ठेविली आहेः—

कथा हि सर्वभाषाभिः संस्कृतेन च बध्यते ।
भूतभाषामयीं प्राहुरद्भुतार्थां बृहत्कथाम् ॥ काव्यादर्श परि. १।३८

बाणभट्टानेंहि हर्षचरितांत बृहत्कथेचा उल्लेख केला आहे.

समुद्दीपितकंदर्पा कृतगौरीप्रसाधना ।
हरलीलेव नो कस्य विस्मयाय बृहत्कथा ॥

या बृहत्कथेचें संस्कृत भाषेंत 'बृहत्कथामंजरी' या नांवानें श्रीक्षेमेंद्रानें रूपांतर केलें आहे. त्याचा काल इ. स. १०२८–१०८० हा होय. बृहत्कथामंजरी मूळास सोडून असल्यामुळें, श्रीसोमदेवभट्टानें "कथासरित्सागर" ग्रंथ बृहत्कथेच्या आधारें लिहिला. त्यांत मूळ ग्रंथास सोडून असें कांहींहि नाहीं. ग्रंथारंभी सोमदेवभट्ट म्हणतोः––

यथामूलं तथैवैतत्
न मनागप्यतिक्रमः ।

हे दोघेहि कवी काश्मीर देशांत अनंतराज हा राज्य करीत असतांना होऊन गेले. दोघेहि समकालीन होते. हालसातवाहन राजाची संपूर्ण माहिती कथासरित्सागराच्या कथापीठ लंबक तरंग ६९ यांत दिली आहे. पैशाची भाषेंतील बृहत्कथा हल्लीं उपलब्ध नाहीं.

मत्स्यपुराणांतील आंध्र घराण्याचा वंशावळ ज्ञानकोश विभाग ४ पृ. १६७ या ठिकाणीं दिला आहे. त्यांत सतरावा राजा हाल असून त्याची कारकीर्द पांच वर्षांची दिली आहे. या राजासंबंधी ज्ञानकोशांत पुढील माहिती सांपडतेः––

"आंध्र घराण्याचा सतरावा राजा हाल याचें नांव वाङ्मयाशीं संबद्ध असल्यामुळें त्याला विशेष महत्त्व आहे. महाराष्ट्रांतील प्राचीन भाषेंत लिहिलेला 'सप्तशती' नामक ग्रंथ हालाचा म्हणून प्रसिद्ध आहे." (ज्ञानकोश वि. ४ पृ. २५२)

" या नंतर १७ वा आंध्रराजा हाल हा स्मिथच्या मतें इ. स. ६८ च्या सुमारास होऊन गेला. गुणाढ्यानें पैशाची लिपींत लिहिलेली बृहत्कथा याच राजाच्या पत्नीप्रीत्यर्थ लिहिली अशी दंतकथा आहे. " (ज्ञानकोश वि. ७ पृ. १४३)

" आंध्रांविषयीं सर्वांत प्राचीन उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत आहे. हे विंध्य पर्वताच्या आसमंतात रहात असावे. बहुतेक पुराणांतून आंध्र राष्ट्राचा उल्लेख सांपडतो. अशोकाच्या १३ व्या शिलालेखांत आंध्रांचा उल्लेख आहे. अशोकाच्या मागून आंध्र लोकांचा उत्कर्ष झाला. राजा कृष्ण याची राजधान

नाशीक येथें असावी. ख्रिस्तपूर्व २ ऱ्या शतकांत लिहिलेल्या चाळीसगावांनजीक पितळखोऱ्यांतील शिलालेखांत प्रतिष्ठानच्या किंवा पैठणच्या राजाचा उल्लेख आहे. आंध्रदेशाचा उल्लेख प्लिनीच्या लेखांत (इ. स. ७७) सांपडतो. पेरिप्लस मधील वर्णनावरून आंध्र देशास दक्षिणापथ (दख्खन) नांव होतें असा प्रथमच स्पष्ट पुरावा मिळतो.

सातवाहन घराणें नागवंशीय असून त्यानें इ. स. पूर्वी पहिल्या शतकाच्या मध्याच्या सुमारास पाटलीपुत्राचें राज्य जिंकून तेथें आपलें वर्चस्व स्थापिलें व पुढें महाराष्ट्रावर स्वारी करून तेथेंहि आपला अंमल बसविला असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. त्यांची राजधानी प्रतिष्ठान म्हणजे पैठण येथें असून ती पूर्वींहि महाराष्ट्राची राजधानी होती." (ज्ञानकोश वि. ७ पृ. १४३।१४४)

वरील सर्व उताऱ्यांचा निष्कर्ष इतकाच कीं विंध्य पर्वतापासून कृष्णानदीपर्यंतच्या मुलुखांत निरनिराळ्या काळीं आंध्र राज्याचा विस्तार होता; आंध्र राजांना सातवाहन राजे अशी संज्ञा होती. या घराण्यांतील सतरावा राजा हाल सातवाहन हा (इ. स. ६८ चे सुमारास) पैठणास राज्य करीत होता; व त्याच्याच प्रेरणेनें गाथासप्तशती तयार झाली. कथासरित्सागरांतील हालाचें वर्णन काल्पनीक नाहीं.

**हाल, शालवाहन सातवाहन या नांवांची व्युत्पत्तिः-**

(४) गाथा सप्तशतीचा संग्राहक, हाल, शालवाहन, सातवाहन या तीन नांवांनीं संबोधिला जातो. या नांवांची व्युत्पत्ति हेमचंद्रानें दिली आहे. ती खालीं देतों.

(अ) "शालो हाले मत्स्यभेदे" इति
"हालः सातवाहन पार्थिवे" इति } हैमानेकार्थः

(अ) **"शलतिशालः। श्यति वा। 'श्यामाद्या'--इति लः।
हालः सातवाहन नृपः। तत्र यथा—"जज्ञे शाल-
महीपालः प्रतिष्ठानपुरे पुरा"। "दिवं गते हालवसुंधराधिपे"।
(अनेकार्थकैरवाकरकौमुदी.)**

(इ) **हालः स्यात्सातवाहनः।** (हैमनाममाला)

(ई) **हलत्यरातिहृदयं हालः। सातं दत्तसुखं वाहनमस्य सातवाहनः। साल वाहनोऽपि।** (अभिधानचिंतामणिः)

(उ) **सालाहणम्मि हालो। हालो सातवाहनः** (देशीनाममाला)

(ऊ) **शालो हालनृपेऽपि च।** (त्रिकाण्डशेषानेकार्थः)

सातवाहन शब्दाची व्युत्पत्ति कथासरित्सागरांत दिली आहे ती अशीः--

**सातेन यस्मादूढोऽभूत् तस्मात्तं सातवाहनं।
नाम्ना चकार कालेन राज्ये चैनं न्यवेशयत्॥**

सात नांवाच्या यक्षाला कुबेराच्या शापामुळें सिंहत्व प्राप्त झालें होतें. त्यानें बालपणीं या राजाला आपल्या पाठीवर वागविलें होतें म्हणून सात + वाहन असें त्याचें नांव पडलें अशी आख्यायिका कथासरित्सागरांत दिली आहे.

## शातवाहन

वात्स्यायनानें कामसूत्रांत "शातवाहन" याचा उल्लेख विशेषनाम म्हणून केला आहे.

**कर्तर्या कुन्तलः शातकर्णिः शातवाहनो महादेवीं मलयवतीं (जघान)** (निर्णयसागर प्रत आवृत्ति २ पृ. १५४)

मलयवती ही हालराजाची पट्टराणी होती, यावरून व कुंतल आणि शातकर्णी या विशेषणांवरून शातवाहन म्हणजे हाल सातवाहन यासच अनुलक्षून वरील उल्लेख असावा असें विद्वानांचें मत आहे.

"In वात्स्यायन 's कामसूत्र, कुंतलशातकर्णी शातवाहन is spoken of as having killed मलयवती by a pair of scissors in connection with certain amorous sport " Early history of the Deccan pp 55-56.

यांत डॉ. भाण्डारकर यांनीं कर्तरी शब्दाचें भाषांतर " A pair of scissors " असें केलें आहेः परंतु कर्तरी शब्द विशिष्ट अर्थानें कामसूत्रांत योजिला असल्यामुळें " A pair of scissors formed by joining the fingers in a particular manner" असें भाषांतर जास्त सयुक्तिक होईल. टीकेंत कर्तरी शब्दाचा खुलासा आहे तो असाः—

> कर्तरी द्विविधा प्रसृतकुञ्चिताङ्गुलिभेदात् ।
> तत्र प्रसृताङ्गुलिर्द्विधा । हस्तेनैकेन भद्रकर्तरी ।
> द्वाभ्यां संश्लिष्टाभ्यां यमलकर्तरी।.........
> उभाभ्यामपि कनिष्ठकाग्रभागेण शिरसि ताडनम् ।

कर्तरी हा प्रहणनाचा एक प्रकार आहे.

### शातकर्णी, शालिवाहन, शाकवाहन.

या शब्दांचे अर्थ कै. राजवाडे यांनीं राधामाधवविलासचम्पूच्या प्रस्तावनेंत दिलेले आहेत व त्या ठिकाणीं सविस्तर खुलासाहि आधारांसह केलेला आहे तो जिज्ञासूंनीं पहावा.

**शातकर्णीः**-- ज्यांच्या वाहनांचे कान चिरफाडलेले होते असे राजे.

**शालिवाहनः**--साळीचें भात आणण्याची गाडी.

**शाकवाहनः**--भाजी खाणारे राजे.

सातवाहन वंशांतील राजांची नांवें कांहीं व्यक्तिविषयक, कांहीं देशविषयक व कांहीं राजांच्या नांवामागें पूर्वी होऊन गेलेल्या राजांची नांवें लावण्याचा प्रघात होता असें डॉ. भाण्डारकर यांचें मत आहे.

(५) येथवर केलेल्या विवेचनावरून आंध्रभृत्य राजे व गाथासप्तशतीचें बहिरंग या बाबतींत स्थूल मानानें माहिती समजेल. आतां हाल सातवाहनाबद्दल सविस्तर माहिती देण्याचा विचार आहे. डॉ. पीटर्सन यांनीं बुंदी राजाच्या पुस्तकालयांतील गाथासप्तशतीची जी हस्तलिखित प्रत मिळविली, त्या प्रतीच्या सातव्या शतकाच्या शेवटीं ग्रंथ समाप्त करतांना पुढें दिल्याप्रमाणें तपशील आहेः—

" इति श्रीमत्कुंतलजनपदेश्वर--प्रतिष्ठानपत्तनाधीश--शतकर्णोपनामक--द्विपिकर्णात्मज--मलयवतीप्राणप्रिय--कालापप्रवर्तकशर्ववर्मधीसख--मलयवत्युपदेशपंडितीभूत--त्यक्तभाषात्रयस्वीकृतपैशाचिकपंडितराजगुणाढ्यनिर्मितभस्मीभवद्बृहत्कथावशिष्ट--सप्तमांशावलोकनप्राकृतादिवाक्पंचकप्रीत--कविवत्सल--हालाद्युपनामक--श्रीसातवाहननरेंद्रनिर्मिता-विविधान्योक्तिमयप्राकृतगीर्गुम्फिता शुचिरसप्रधाना काव्योत्तमा सप्तशत्यवसानमगात् । "

या समाप्तींत सातवाहन नरेंद्राला दहा विशेषणें लाविलीं आहेत व त्यावरून हालासंबंधीं यथार्थ माहिती मिळते. प्रत्येक विशेषणानें कोणती माहिती मिळते तें खालीं क्रमवार देतोंः—

### (*i*) श्रीमत्कुंतलजनपदेश्वर.

सातवाहन कुंतल देशावर राज्य करीत होता. कुंतलदेश कोणता तें खालीं दिलेल्या श्लोकावरून समजतेंः—

> कामगिरीं समारभ्य द्वारकान्तं महेश्वरि ।
> श्री कुंतलाभिधो देशो हूणदेशं शृणु प्रिये ॥

तस्मिन् समये गुर्जरदेशेऽपि (गुजराथ) सातवाहनस्य प्रभुत्वमासीत् ।

### (२) प्रतिष्ठानपत्तनाधीश.

प्रतिष्ठान नगर उर्फ पैठण ही सातवाहनाची राजधानी होती.

### (३) शतकर्णोपनामक (४) द्विपिकर्णात्मज (५) मलयवतीप्राणप्रिय

सातवाहनाच्या पित्याचे नांव द्विपिकर्ण, कुलनाम शतकर्ण व त्याच्या पट्टराणीचें नांव मलयवती होते.

### (६) कालापप्रवर्तकशर्मवर्मधीसख.

कालाप ऊर्फ कौमार ऊर्फ कातंत्र या व्याकरणाचा कर्ता शर्ववर्मा हा सातवाहनाचे पदरीं होता व त्यानेंच सातवाहनास संस्कृतादि भाषा शिकविल्या. यामुळें संतुष्ट होऊन सातवाहनानें शर्ववर्म्याला गुरुदक्षिणार्थ भरुकच्छ (भरोच) देशाचें प्रभुत्व दिलें:—

> **राजार्हरत्ननिचयैरथ शर्ववर्मा तेनार्चितो गुरुरिति प्रणतेन राज्ञा ।**
> **स्वामीकृतश्च विषये भरुकच्छनाम्नि कूलोपकंठविनिवेशिनि नर्मदायाः ॥**
>
> (कथासरित्सागर तरंग १।६ श्लोक १६६)

कालाप व्याकरणाचा कर्ता शर्ववर्मा इसवी सनाच्या पहिल्या शतकांत झाला ही गोष्ट पौर्वात्य व पाश्चात्य पंडितांस मान्य आहे. डॉ. बेलवलकर यांनीं Systems of Sanskrit Grammar या पुस्तकांत कालाप व्याकरणाबद्दल माहिती दिली आहे; ते म्हणतात,

" The Kātantra is otherwise known as Kaumāra; Kumāra revealed the Sūtras of the Kaumāra Grammar. As the God's vehicle, the bird Kalāpin (peacock), was the instrument of communication, the Sūtras also obtained their other name. The date of the rise of the school as given by the tradition is not at all inconsistent with other ascertained facts...In that case the beginning of the Kātantra will have to be put in the first century of the Christian era." (page 82, 83, and foot note).

शर्ववर्म्याच्या उल्लेखावरून सातवाहनाचा काळ नक्की ठरतो.

### (७) मलयवत्युपदेशपंडितभूत.

मलयवतीच्या उपदेशानें पंडित झालेला असा या विशेषणाचा अर्थ आहे. सातवाहन हा प्रथमतः निरक्षर होता. एका प्रसंगीं मलयवतीसह इतर राण्यांबरोबर तो जलक्रीडा करीत असतांना मलयवतीनें 'अंगावर पाणी मारूं नको' ( मोदकैः परिताडय माम् ) असें त्यास संस्कृत भाषेंत सांगितलें; परंतु तो संस्कृतानभिज्ञ असल्यामुळें त्यानें 'मला मोदकांनीं ताडण कर' असा अर्थ समजून मोदकांचें ताट आणविलें. त्यावरून मलयवतीनें त्याची फजीती केली. तेव्हां त्यास विषाद वाटून शर्ववर्म्याकडून तो संस्कृतादि भाषा शिकला अशी कथा कथासरित्सागरांत दिली आहे; त्यांतील या विषयासंबंधीं श्लोक खालीं देतों:--

> **अथैका तस्य महिषी राज्ञः स्तनभरालसा ॥**
> **शिरीषसुकुमारांगी क्रीडन्ती क्रममभ्यगात् ॥११३॥**
> **साजलैरभिषिंचन्तं राजानमसहासती ।**
> **अब्रवीन्मोदकैर्देव परिताडय मामिति ॥११४॥**
> **तच्छ्रुत्वा मोदकान्राजा द्रुतमानाययद्बहून् ।**
> **ततो विहस्य सा राज्ञी पुनरेवमभाषत ॥११५॥**

राजन्नवसरः कोऽत्र मोदकानां जलान्तरे ।
उदकैः सिंच मा त्वं मामित्युक्तं हि मया तव ॥११६॥
संधिमात्रं न जानासि माशब्दोदकशब्दयोः ।
न च प्रकरणं वेत्सि मूर्खस्त्वं कथमीदृशः ॥११७॥
इत्युक्तः स तया राज्ञा शब्दशास्त्रविदा नृपः ।
परिवारे हसत्यन्तर्लज्जाक्रान्तो झगित्यभूत् ॥११८॥
परित्यक्तजलक्रीडो वीतदर्पश्च तत्क्षणम् ।
जातावमानो निर्लक्षः प्राविशन्निजमंदिरम् ॥११९॥
ततश्चिंतापरो मुह्यन्नाहारादिपराङ्मुखः ।
चित्रस्थ इव पृष्टोऽपि नैव किंचिदभाषत ॥१२०॥
पांडित्यं शरणं वा मे मृत्युर्वेति विचिन्तयन् ।
शयनीयपरित्यक्तगात्रः संतापवानभूत् ॥१२१॥

(कथापीठलंबक तरंग ६)

वर वर्णन केल्याप्रमाणें राजा उद्विग्न स्थितींत असतांना गुणाढ्य व शर्ववर्मा त्यास भेटावयास गेले; तेव्हां त्यानें त्या उभयतांस असा प्रश्न केला कीं "परिश्रमपूर्वक अध्ययन केलें असतां मनुष्य किती दिवसांत विद्वान होईल ?"

शिक्षमाणः प्रयत्नेन कालेन कियता पुमान् ।
अधिगच्छति पांडित्यमेतन्मे कथ्यतां त्वया ॥ १४२ ॥

या प्रश्नास गुणाढ्यानें उत्तर दिलें कीं 'सर्व विद्यांचें मुख जें व्याकरण तें शिकण्यास बारा वर्षें अध्ययन करावें लागेल;' परंतु शर्ववर्मा म्हणाला "मी सहा महिन्यांत व्याकरणशास्त्र शिकवीन." शर्ववर्म्याचें हें असंभाव्य भाषण ऐकून गुणाढ्य म्हणालाः—

श्रुत्वैवैतदसंभाव्यं तमवोचमहं रुषा ।
षड्भिर्मासैस्त्वया देवः शिक्षितश्चेत्ततो मया ॥ १४७ ॥
संस्कृतं प्राकृतं तद्वद्देशभाषा च सर्वदा ।
भाषात्रयमिदं त्यक्तं यन्मनुष्येषु संभवेत् ॥ १४८ ॥

ही गुणाढ्याची प्रतिज्ञा ऐकून शर्ववर्म्यानेंहि प्रतिज्ञा केली कीं,

शर्ववर्मा ततोऽवादीन्न चेदेवं करोम्यहं ।
द्वादशाब्दान् वहाम्येष शिरसा तव पादुके ॥ १४९ ॥

अशी प्रतिज्ञा करून शर्ववर्मा निघून गेला. त्यानें कार्तिकस्वामीस प्रसन्न करून घेतलें व कलापि-(मोर)द्वारा कुमारानें त्यास कातंत्रव्याकरण शिकविलें. अशी विद्या–सिद्धि झाल्यावर तो परत आला व त्यानें सातवाहनाला विद्या शिकविली. या कथानकावरून 'मलयवत्युपदेशपंडितीभूत' या विशेषणाची सार्थता प्रतीत होते.

(८) त्यक्तभाषात्रय.........प्राकतादिवाक्पंचकप्रीत. शर्ववर्म्यानें सहा महिन्यांत सातवाहनाला विद्यासंपन्न केलें; यामुळें गुणाढ्यानें प्रतिज्ञेप्रमाणें संस्कत, प्राकृत व देशी या तीन भाषांचा त्याग करून पैशाची भाषेचा अंगिकार केला व त्या भाषेंत बृहत्कथाग्रंथ लिहिला. त्या ग्रंथांत सात कथा असून ग्रंथ-संख्या सात लक्ष होती. तो ग्रंथ गुणाढ्यानें आपल्या शिष्यांबरोबर सातवाहनाकडे पाठविला; परंतु तो रक्तानें लिहिला असून त्याची भाषा पैशाची होती म्हणून सातवाहनानें त्या ग्रंथाचा अनादर केला तेव्हां शिष्य परत गेले. गुणाढ्यास हें वर्तमान समजल्यावर त्यानें बृहत्कथा अग्निसात् करण्याचा निश्चय केला व

त्याप्रमाणें एका घोर वनांत अग्निकुंड पेटवून ग्रंथाचें एक एक पान वाचून तो अग्नीस समर्पण करूं लागला. सातवाहनास कांहीं कारणानें हा वृत्तांत समजला व तो त्या स्थळीं आला. तेव्हां सहा कथा अग्निसात् झाल्या होत्या, फक्त सातवी कथा शिल्लक राहिली होती. ती सातवाहनानें मागून घेतली. या कथा-भागास अनुलक्षून 'भस्मीभवद्वृहत्कथावशिष्टसप्तमांश' असे शब्द आठव्या विशेषणांत आले आहेत.

आठव्या विशेषणांत 'प्राकृतादिवाक्पंचकप्रीत' असें एक पद आहे त्याचा अर्थ शौरसेनी-मागधी महाराष्ट्री-पैशाची व देशी अशा पांच भाषा किंवा चार प्राकृत भाषा व पांचवी प्राकृतोद्भव अपभ्रंश भाषा असाहि होऊं शकेल.

### (९) कविवत्सल (१०) हालाद्युपनामक.

कवीविषयीं प्रेम-आदर-बाळगणारा व ज्याचें उपनांव हाल असें होतें तो. ( कविवत्सलेन हालेन असें गाथा १।३ यांत आहे.)

(६) पांचव्या कलमांत वर्णन केल्याप्रमाणें जो हाल सातवाहन राजा होऊन गेला त्यानें संस्कृत काव्यांतील अन्योक्ति संकलित करून महाराष्ट्रीभाषायुक्त ही गाथा-सप्तशती तयार केली. या काव्यांतील सर्व श्लोक गाथानामक मात्रागण वृत्तांत दिलेले आहेत. गाथावृत्ताचें लक्षण प्राकृत पिंगलांत दिलें आहे तें असें:—

पढमं वारह मत्ता बीए अट्ठारएहिँ संजुत्ता।
जह पढमं तह तीअं दहपंचविहूसिआ गाहा ॥

याच गाथावृत्ताला संस्कृतांत आर्या असें नांव आहे. त्याचें लक्षण: —

यस्याः पादे प्रथमे द्वादशमात्रास्तथा तृतीयेऽपि
अष्टादश द्वितीये चतुर्थके पंचदश सार्या ॥

एखाद्या गाथेंत मात्रा कमी अगर जास्त होत असेल तर काय करावें तें पिंगलानें सांगितलें आहे

जइ दीहो विअ वण्णो
लहु जीहा पढइ होइ सो वि लहू।
वण्णो वि तुरिअ पढिओ ॥
दोतिण्णि वि एक्क जाणेहू ॥ प्रा. पिं. सूत्र ॥ ८ ॥

दीर्घस्वराचा ऱ्हस्वस्वराप्रमाणें उच्चार करणें, अनुस्वाराचा अनुनासिक उच्चार करणं, या दोन प्रकारांनीं मात्रा कमी करतां येते; तसेंच ह्रस्वाचा दीर्घ उच्चार करणे किंवा एखाद्या शब्दावर आगंतुक अनुस्वार देणें यामुळें कमी पडणाऱ्या मात्रेची भरती होते. जरूर तो फरक करून छंदोभंग होऊं देऊं नये. दोन तीन वर्णांचा त्वरित उच्चार केल्यानें तो एकच वर्ण समजावा. याच नियमानें खालील श्लोक-पादाचे गण बरोबर मानतां येतील:—

**स्रग्धरा**-ऐशा काव्या रचाया (इकडून तिकडून आणलेली) बुद्धि दे चक्रपाणी।

गाथासप्तशतींत दीर्घाचा ऱ्हस्व उच्चार कांहीं ठिकाणीं केल्याशिवाय मात्रा बरोबर जमत नाहींत. अशा अक्षरांवर निर्णयसागरी प्रतींत अर्ध चंद्राकृती (˘) चिन्ह केलें आहे.

काव्य छंदांभंगयुक्त व लक्षणविहीन नसावें असें प्राकृत पिंगलसूत्रांत सांगितलें आहे; संस्कृत छंदःशास्त्राचाहि तसाच नियम आहे. ( अपि माषं मषं कुर्यात् । छंदोभंगं न कारयेत् । ) यासंबंधानें पिंगलाचीं सूत्रें खालीं दिलीं आहेत:—

जेम ण सहइ कणअतुला । तिलतुलिअं अद्धअद्धेण ।
तेम ण सहइ सवणतुला । अवच्छन्दं छंदभंगेण ॥ १० ॥

( अवच्छन्दं-न्यूनाधिकभावमिति देशी )
अबुह बुहाणं मज्झे कव्वं जो पढइ लक्खण विहूणं ।
भूअग्ग लग्ग खग्गहिँ सीसं खुलिअं ण जाणइ ॥ ११ ॥

गाथासप्तशतींतील गाथा प्राकृत पैंगलांत दिलेल्या नियमाप्रमाणें शास्त्रशुद्ध आहेत.

महाराष्ट्री प्राकृताच्या अपभ्रंशापासून मराठी भाषा निघाली आहे ही गोष्ट विद्वन्मान्य आहे. वररुचि-कात्यायनानंतर जवळ जवळ चारशें वर्षांनीं गाथासप्तशती संकलित झाली आहे. इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापासून मूळ ग्रंथाचा काळ धरतां येईल असें ज्ञानकोशकारांचें मत आहे. " सत्तसईच्या कमींत कमी ६ निरनिराळ्या प्रति उपलब्ध आहेत. या सर्व प्रतींतून फक्त ४३० कविताच आढळतात. थोड्याफार प्रमाणांत एकीकृत स्वरूपांत असलेला याचा मूळ ग्रंथ कदाचित पुढील नकलनवीसाच्या हातून केवळ संकलित स्वरूपाचा बनला असेल. मूळ ग्रंथाचा काळ इ. स. च्या २ ऱ्या शतकापासून धरतां येईल. म्हणजे सर्व प्रतींत आढळणाऱ्या कवितांनाच फक्त हा काल लागू पडेल. इतर भाग पुढील काळचा असला पाहिजे यांत संशय नाहीं. तथापि महाराष्ट्री भाषेंतील हा सर्वांत जुना ग्रंथ होय."
(ज्ञानकोश विभाग ११ पृ. ४४३)

सप्तशतींतील व्याकरणाचीं रूपें वररुचिकृत प्राकृतप्रकाशांतील नियमाप्रमाणें आहेत. व सप्तशतींत वररुचीपेक्षां धात्वादेश जास्त आढळतात. याचें कारण वररुचीनंतर महाराष्ट्री भाषेची वाढ होत होती व सातवाहन राजांच्या काळीं ही भाषा पूर्णत्वास पोंचली असून ती बोलण्याची व राजदरबारचीहि भाषा होती; यास प्रत्यंतर, तत्कालीन शिलालेख महाराष्ट्री भाषेंत आहेत हें होय. उपलब्ध काव्यांत सप्तशती हें सर्वांत जुनें काव्य आहे. वर्तमान मराठींतील शब्दांचे अर्थ व व्युत्पत्ति समजण्यास प्राकृत काव्य जितकें जुनें असेल तितका अधिक उपयोग होतो; ही गोष्ट श्रीचक्रधराच्या दिनचर्येवर कै. राजवाडे यांनीं ज्या टिपा दिल्या आहेत त्यांत त्यांनीं स्पष्ट करून दाखविली आहे. कै. राजवाडे यांनीं 'विस्तोविस्तव' या शब्दाची व्युत्पत्ति "विष्णु" या शब्दापासून केली होती; परंतु "श्रीचक्रधराची दिनचर्या" त्यांनीं प्रसिद्ध केल्यावर, 'वैश्वदेव' या शब्दापासून 'विस्तो-विस्तव' हे शब्द निघाल्याचें त्यांनीं दाखविलें आहे. सप्तशतींत सुमारें ७५ शब्द देशी आहेत असें टीकेवरून समजतें. सप्तशतीची भाषा व्याकरणशुद्ध साधी व जोरदार अशी आहे. सप्तशतीच्या मानानें 'सेतुबंध, व "गौडवहो" या प्राकृत काव्यांतील भाषा क्लिष्ट आहे; तथापि दण्डी व बाण हे दोन्ही कवी 'सेतुबन्ध' काव्याची फार प्रशंसा करतातः—

## दण्डी [काव्यादर्श]

महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः ।
सागरः सूक्तिरत्नानां सेतुबन्धादि यन्मयम् ॥

## बाण (हर्षचरित)

कीर्तिः प्रवरसेनस्य प्रयाता कुमुदोज्वला ।
सागरस्य परं पारं कपिसेनेव सेतुना ॥

बाणाच्या श्लोकांतील 'सेतुना' हा शब्द श्लिष्ट आहे. सेतुबन्ध काव्यांत वररुचीचे नियम (कगच-जतदपयवां प्रायो लोपः । वगैरे) कडक रीतीनें पाळले आहेत. त्यामुळें सहज श्लोक वाचल्याबरोबर मूळ संस्कृत शब्द प्रतीत होत नाहीं; वाक्पतिराजाच्या 'गौडवंधांत' स्वरांबद्दल 'य' जास्त घातले आहेत. याला 'यश्रुति' म्हणतात. [पहा. अवर्णो यश्रुतिः । हैमव्याकरण अध्या० ८ पाद १ सू. १८० ]

उत्तरोत्तर महाराष्ट्रीचा साधेपणा गेला आहे. सप्तशतींतील श्लोक वाचल्याबरोबर बोध कसा होतो तें खालील श्लोकांवरून समजेल,

सो अत्थो जो हत्थे तं मित्तं जं णिरंतरं वसणे।
तं रूअं जत्थ गुणा तं विण्णाणं जहिं धम्मो ॥ श. ७।९५
धण्णा बहिरा अन्धा ते व्विअ जीअन्ति माणुसे लोए।
ण सुणन्ति पिसुणवअणं खलाणँ ऋद्धिं ण पेक्खन्ति ॥ श. २।६३

[सप्तशतींत सेतुबन्ध काव्याप्रमाणें यमकें साधलेलीं नाहींत.]

अनुप्रास मात्र २१३ स्थळीं साधले आहेत. जरी शब्दालंकार फार नाहींत तरी उपमा, दृष्टान्त, अर्थान्तरन्यास, स्वभावोक्ति, विशेषोक्ति, भ्रांतिमान् वगैरे अलंकार बऱ्याच गाथांत आहेत.

नमुन्याकरितां अलंकाराचीं दोन उदाहरणें खालीं देतोंः—

जेण विणा ण जिविज्जइ अणुणिज्जइ सो कआवराहो वि।
पत्ते वि णअरदाहे भण कस्स ण वल्लहो अग्गी ॥ श. २।६२

छाया

येन विना न जीव्यतेऽनुनीयते स कृतापराधोऽपि।
प्राप्तेऽपि नगरदाहे भण कस्य न वल्लभोऽग्निः ॥

ही गाथा रोधानामक कवयित्रीची आहे. यांत पतीनें पत्नीच्या बाबतींत जरी शास्त्रमर्यादेचें उल्लंघन करून तिचा उपमर्द केला, तरी पतीवांचून स्त्रीला गत्यंतर नसल्यामुळें पतीचे अपराध क्षमा करणें तिला भाग पडतें असा ध्वनि असून त्याचें समर्थन अग्नीचा दृष्टान्त घेऊन केलें आहे.

धवलो सि जइवि सुन्दर तहवि तुए मज्झ रञ्जिअं हिअअम्।
राअभरिए वि हिअए सुहअ णिहिओ ण रत्तोसि ॥ श. ७।६५

छाया

धवलोऽसि यद्यपि सुन्दर तथापि त्वया मम रंजितं हृदयम्।
रागभृतेऽपि हृदये सुभग निहितो न रक्तोऽसि ॥

या गाथेंत 'धवल' व 'राग' हे श्लिष्ट शब्द घालून विरोध दाखविला आहे.

स्त्रीस्वभावाचें मर्म स्त्रियांना जितकें विशद करितां येतें तितकें पुरुषांना करितां येत नाहीं हें खालील गाथेवरून समजून येईल. खालील गाथा माधवीची आहेः—

णूमेन्ति जे पहुत्तं कुविअं दासाव्व जे पसाअन्ति।
ते व्विअ महिलाणं पिआ सेसा सामि व्विअ वराआ ॥ श. १।९१

छाया

गोपायन्ति ये प्रभुत्वं कुपितां दासा इव ये प्रसादयन्ति।
त एव महिलानां प्रियाः शेषाः स्वामिन एव वराकाः ॥

संस्कृत, पाली, प्राकृत या शिवाय देशी म्हणून एक स्वतंत्र भाषा होती व त्या भाषेंतील शब्द वर्तमान मराठींत प्रचलित आहेत. देशी भाषेचें अस्तित्व दण्डीनें मान्य केलें आहे. परंतु देशी हा प्राकृताचाच एक प्रकार आहे असें त्यांचें मत आहेः—

संस्कृतं नाम दैवी वागन्वाख्याता महर्षिभिः।
तद्भवस्तत्समो देशीत्यनेकः प्राकृतक्रमः ॥ काव्यादर्श १।३३.

सप्तशतींत प्राकृत शब्द ज्या साध्या स्वरूपांत आढळतात, त्याच स्वरूपांत ते शब्द मराठीच्या बोलण्यांत हल्लींहि आहेत. वर्तमानकाळीं महाराष्ट्रांत शिष्टवर्गाची भाषा संस्कृतशब्दप्रचुर आहे, तर अशिष्ट वर्गाची भाषा प्राकृतास धरून आहे. तेव्हां भाषा शास्त्राच्या दृष्टीनेंहि सप्तशतीस विशेष महत्त्व आहे.

सप्तशतीसंबंधानें डॉ. भाण्डारकर यांचा अभिप्राय पुढें दिल्याप्रमाणें आहे:--

There is a work written in the old Mahārāstri dilect called Saptaśatī, which is of the nature of an anthology, consisting of Gāthās or stanzas in the Āryā metre, mostly on love matters.

The author of this is, in the third verse, mentioned as Hāla and ordinarily he is spoken of as शालिवाहन. Bāṇa speaks of it in his introduction to his हर्षचरित. Verses from it are quoted in Dhanika's commentary on the दशरूपक in the सरस्वतीकंठाभरण and in the काव्यप्रकाश.

From the traditions we may, I think, safely conclude that the literature flourished under the rule of the आंध्रभृत्यs and that the Prakrits or spoken languages, especially the महाराष्ट्री, were probably for the first time used for literary purposes."

(Early history of the Deccan, pp. 55-56)

सप्तशतीसंबंधी ज्ञानकोशकारांचा अभिप्राय पुढें दिल्याप्रमाणें आहे.

"सत्तसईतील प्रत्येक खंड सामान्यतः एक पूर्ण पद म्हणतां येईल; कांहीं कांहीं ठिकाणीं २।३ खंड मिळून एक पद बनलें आहे. यांत अगदीं थोड्या शब्दांत एखादी मनःस्थिती चित्रित केली आहे; किंवा एखादी तक्रार सांगितली आहे किंवा प्रेमानंद वर्णिला आहे. प्रवासाला गेलेल्या नवऱ्याबद्दल शोक करणारी स्त्री तर वारंवार दिसते. तसेंच नवरा किंवा बायको मरण पावल्याबद्दलचा शोक, गुप्तप्रेम, प्रणयी जनांचीं भांडणें, मुलाला पहिल्यानें दांत आल्याचें पाहून झालेला आनंद, इत्यादि निसर्गाचें वर्णनहि मधून मधून येतें. "भटकणाऱ्याला जमा त्याच्या सावलीचा उपयोग त्याचप्रमाणें कृपणाला त्याच्या संपत्तीचा उपयोग असतो" यासारख्या बोधप्रद म्हणी या ग्रंथांत आढळतात. (ज्ञानकोश वि. ११ पृ.४४३)

(८) गाथासप्तशती विशिष्ट कवीनें विशिष्ट विषय घेऊन रचिली नसल्यामुळें, गाथांवरून समजणारी माहिती व समाजस्थिती विशिष्ट काळाची व विशिष्ट देशांतील आहे असें मानतां येणार नाहीं. तथापि शालिवाहनशकाच्या पहिल्या शतकांत साधारणपणें कुंतलदेशांत चालीरीति, उद्योगधंदे, कौटुंबिक परिस्थिती कशा प्रकारची होती तें समजतें. गाथांवरून दिसून येणारी माहिती क्रमवार खालीं दिली आहे. त्यांत महत्त्वाची व किरकोळ असा भेद केला नाहीं.

## (१) ऐतिहासिक व भौगोलिक

विक्रमादित्यानें पैठणावर स्वारी केली त्यावेळीं शालिवाहनानें त्याचा पराभव केला अशी दंतकथा आहे, त्यांत कांहींतरी सत्य आहे असें डॉ. भाण्डारकर यांचें मत आहे.

वरील दोन ऐतिहासिक व्यक्तींचा उल्लेख सप्तशतींत आहे.

संवाहणसुहरसतोसिएण देन्तेण तुह करे लक्खम्।
चलणेण विक्कमाइत्तचरिअं अणुसिक्खिअं तिस्सा ॥ (शतक ५-६४)

छाया

संवाहनसुखरसतोषितेन ददतां तव करे लाक्षाम्।
चरणेन विक्रमादित्यचरितमनुशिक्षित तस्याः॥

शत्रूंवर चाल करून जाणाऱ्या सैनिकांवर खुष होऊन विक्रमादित्य त्यास लक्ष द्रव्य देत असे असा या गाथेचा विक्रमादित्यपक्षीं अर्थ आहे.

आवण्णाइँ कुलाइं दो च्चिअ जाणन्ति उण्णइं णेउम्।
गोरीअ हिअअदइओ अहवा सालाहणणरिन्दो॥ श. ५-६७

छाया

आपन्नानि कुलानि द्वावेव जानीत उन्नतिं नेतुम्।
गौर्या हृदयदयितोऽथवा शालिवाहननरेंद्रः॥

आपत्तींत पडलेल्या कुलांना उन्नतावस्थेप्रत नेण्याची कला फक्त शंकर किंवा शालिवाहन नरेंद्र हे दोघेच जाणतात. शालिवाहन फार परोपकारी व उच्च कुळांतील होता अशी त्याची कीर्ती राजशेखराच्या काळापर्यंत होती व ही गोष्ट खालील श्लोकांवरून व्यक्त होत आहे:—

सच्चं भण गोदावरि पुव्वसमुद्देण साहिया सन्ती।
सालाहणकुलसरिसं जइ ते कुले कुलं अत्थि॥

हे गोदावरी नदि, तूं पूर्वसमुद्राला जाऊन मिळेपर्यंत ज्या प्रदेशांतून जातेस, त्या प्रदेशांत तुझ्या कांठावर शालिवाहन कुलासारखें एक तरी श्रेष्ठ कुल आहे काय ते खरें सांग. ज्याप्रमाणें शालिवाहनाचें कुल श्रेष्ठ त्याप्रमाणें त्याचा दराराहि जबरदस्त होता असें खालील श्लोकावरून दिसतें.

उत्तरओ हिमवन्तो दाहिणओ सालवाहणो राआ।
समभारभरक्कन्ता तेण न पल्लत्थए पुहवी॥ (राजशेखर)

उत्तरेला हिमालय व दक्षिणेस शालिवाहन राजा या दोघांच्या समभारानें आक्रान्त झाल्यामुळें पृथ्वी समतोल राहिली आहे. ( न पल्लत्थए = न पर्यस्यते = पालथी अगर उपडी होत नाहीं.)

भौगोलिक बाबतींत, सप्तशतींत हिमालय व विंध्यपर्वत या दोहोंचा उल्लेख येतो, तसेंच नर्मदा, तापी, गोदावरी व रेवा या नद्या व पल्ली आणि गिरिग्राम हीं गांवें, यांचेहि गाथांमधून उल्लेख आढळतात. विशेषतः गोदावरीच्या तीरावरील निकुंजांचें वर्णन व त्यांत विलास भोगणारे गुप्तप्रणयिजन यांचे उल्लेख वारंवार येतात. गोदावरीच्या पावित्र्याचें कोठें वर्णन नसून, गोदातट म्हणजे प्रणयिजनांना निर्धास्त रीतीनें विलास करण्याचें एक स्थानच त्या काळीं असावें असा भास होतो. राधाकृष्णाच्या प्रेमलीलांचें स्थान यमुना तटावरचे कुंज होते असें जयदेव गीतगोविंद काव्यांत म्हणतोः—

इत्थं नन्दनिदेशतश्चलितयोः प्रत्यध्वकुंजद्रुमम्।
राधामाधवयोर्जयन्ति यमुनाकूले रहःकेलयः॥

मेघदूतकाव्यांतहि नीचैराख्यगिरीचें असेंच वर्णन कालिदास कवीनें केलें आहे:—

यः पण्यस्त्रीरतिपरिमलोद्गारिभिर्नागराणाम्।
उद्दामानि प्रथयति शिलावेश्मभिर्यौवनानि॥

फुलें गोळा करण्याच्या मिषानें एक तरुण गोदावरीच्या तीरावरील निकुंजाकडे जात असतां, त्याला खालील उपदेश केला आहे:—

मा व्रज पुष्पलवनशील देवा उदकाञ्जलिभिस्तुष्यन्ति।
गोदावर्याः पुत्रक शीलोन्मूलानि कूलानि॥

### (२) देवताविषयक.

शिवपार्वती, राधाकृष्ण, यशोदागोपी, रामसीता व लक्ष्मण यांचे उल्लेख आढळतात. विंध्यवासिनी देवीचें वर्णन आहे. गणपतीच्या मूर्ती करीत असत.

### (३) व्यापारधंदे वगैरे

गाथांतील वर्णनावरून सर्व देश कृषिप्रधान असावा असें दिसतें. शेतांत नांगर धरण्यापूर्वी नवराबायको शेताची पूजा करीत असत. तिळाची व साळीची शेतें यांचे उल्लेख अनेक आहेत. साळी, तीळ, ताग, तुरी व कापूस हे जिन्नस पिकवीत असत. धान्य खळ्यावर मळीत असत. उसाची लागवड होत असे व यंत्रानें ( चरक ) उसाचा रस काढून त्यापासून गूळ करीत असत. शेतकरीलोकांशिवाय, व्याधांची (पुलिन्द) वस्ती होती. हे लोक धनुष्यबाणानें हत्तींची शिकार करीत. गांवांत दुकानदार व वैद्यहि असत. गायनकला अवगत होती. पिढीजाद नायकिणी असत. आई वृद्ध झाली म्हणजे मुलगी धंदा चालवीत असे व आई कुंटीणपणा करीत असे. व्याध लोक सैन्यांत नोकरी करीत असत, लढाईंत धनुष्य बाणाचा उपयोग करीत असत. फुलें विकणाऱ्या माळणींची दुकानें असत.

### (४) कुटुंबव्यवस्था.

आई, बाप, सासू सासरा, आत्याबाई,मावशी,मामी, दीर,भावजय, मुलगा, मुलगी, सून हे नात्याचे दर्शक शब्द आढळतात. सपत्नीचा उल्लेख येतो, यावरून दोन बायका करण्याची चाल होती असें दिसतें. दिराच्या वर्तणुकीवर भावजयीची सक्त नजर असे व वावगें दिसल्यास सासूच्या कानावर ती गोष्ट भावजय घालीत असे. एका भावजयीनें अशी तक्रार केली कीं, "आपल्या गांवांत फक्त पाटलाच्या ( ग्रामणी ) घरींच काय तो पाटली वृक्ष आहे असें असून दररोज दिराच्या डोक्यांत पाटलीवृक्षाचीं बरींच फुलें असतात ही गोष्ट बरी नव्हे." क्वचित् प्रसंगीं दिराची भावजयीवर वांकडी नजर आहे असें तिच्या लक्षांत आल्यास, त्यानें बोध घ्यावा म्हणून सीता व लक्ष्मण यांचीं चरित्रविषयक चित्रें भावजय कुडाच्या भिंतीवर काढीत असे. रजस्वला तीन दिवस अस्पृश्य असे; रजस्वलेचें चिन्ह म्हणून तीन दिवस तोंडाला वर्णघृत लावण्याची पद्धत होती. प्रथमरजस्वलेच्या वस्त्राचें प्रदर्शन तिचे भाऊ करीत असत. त्या वस्त्राला आनंदपट ( आणंदवड ) म्हणत असत. "आनंदपट" याचा हा विशिष्ट अर्थ पुढें बदलला असून, हारावली कोशांत 'नवोढावस्त्र' असा अर्थ दिला आहे. पती प्रवासाला गेला असतां स्त्रिया अंबाडा बांधीत असत. गळयांत कंठा (कंठिका), हातांत वलयें व कानांत कुंडलें ( ताटंक) व पायांत नूपुरें घालण्याची पद्धत होती. लग्नकार्यांत मंगलगीतें गात असत. चतुर्थी होम झाल्यानंतर लग्नविधीची परिसमाप्ति होत असे व जांवई बायकोला घेऊन जात असे. दुपारीं जेवणाचे वेळीं भिक्षेकरी आल्यास अन्नाची भिक्षा वाढण्याची चाल होती. रानशेणी, कोंडा, भुस्कट व लाकडें यांचा जळिताकडे उपयोग करीत असत. स्त्रिया कुसुंबी रंगाचीं वस्त्रें नेसत असत. फाल्गुनांतील शिमग्याच्या सणाचा उल्लेख असून धुळवडीच्या दिवशीं अंगाला चिखल फासण्याचा प्रघात असे. प्रयाणास अंगारकवार ( मंगळवार ) व विष्टियुक्त ( भद्रायुक्त ) दिवस अशुभ मानीत असत. बुद्ध भिक्षूचें दर्शन अपशकून मानला जात असे.

### (५) ग्रामव्यवस्था.

गांवांत गांवचा एक पुढारी ( ग्रामणी ) असे. मुख्य वस्ती व्याध व शेतकरी यांची होती. गांवांत सडका असत. पाण्याकरितां गांवाबाहेर सार्वजनिक तलाव होते. विहिरीला रहाटगाडगीं असत. देवळें बांधण्याची पद्धत होती. प्रवाशाला रात्रीं अंथरुणाऐवजीं निजण्याकरतां गवत ( पेंढा ) देण्याची पद्धत होती.

(६) वनस्पतिविषयक

अंबा, बोरी, जांबळी, अंकोठ ( पिस्त्याचें झाड ), अशोक, बिल्व, कदंब, पाडळी (पाटला ) व वड या वृक्षांचा उल्लेख आहे. हल्लीं ज्याला वाळूक–काकडीचा एक प्रकार–म्हणतात तें फळ ( वालुंकी ) सप्तशतीच्या काळीं होतें. दाट लतांमधून वांदरिणीचा पंजा बाहेर लोंबत होता तो खाजकुइलीचा (कपिकुच्छ–शूकशिंबी) घड असें समजून वानरानें त्याला स्पर्श केला नाहीं. तसेंच एका वानराला भुंगा चावला यामुळें तत्सदृश जांभूळ पाहून वानर तें खाईना अशी भ्रांतिमाम् अलंकाराचीं उदाहरणें गाथांत आढळतात.

(७) विविधविषयक

( अ ) गाय, बैल, म्हैस, रेडा, कुत्रा, मांजर, या ग्राम्य पशूंचा व हत्ती, हरण, डुक्कर या वन्य पशूंचा उल्लेख येतो; माकड, वानर, मोर, पोपट, कावळा, बगळे, बेडुक, कोंबडा, झिल्ली ( झिंगुर ) व हालाहल ( ब्रह्मनिया–एक प्रकारचा सर्प ) इत्यादिकांचे उल्लेख गाथांत आहेत. प्रभातकालसूचक कोंबड्यांचा आरव होत असे. बोलणाऱ्या सारिका पिंजऱ्यांत घालून पाळण्याची चाल होती.

( ब ) त्या काळीं नट तोंडाला हरताळ लावीत असत. दंतधावनार्थ करंजवृक्षाच्या शाखांचा उपयोग करीत असत. मदिरापानाचा उल्लेख आढळतो. बली, वामनरूपी हरी, कापालिकव्रत, ऐन्द्रजालिक लोक, कुरुनाथ ( दुर्योधन ), भीम यांचेहि उल्लेख गाथांतून येतात.

( क ) कालिदासाच्या ऋतुसंहार काव्यांत वर्णन केल्याप्रमाणें उन्हाळ्याचें वर्णन सप्तशतींत आहे असें खालील श्लोकावरून दिसेलः—

१ गिरिस्रोत इति भुजंगं महिषो जिव्हया लेढि संतप्तः ।
महिषस्य कृष्णप्रस्तरक्षर इति सर्पः पिबति लालाम् ॥
२ पश्यार्द्रीक्रियते मोघं भुजंगकृत्तौ कटकलग्नायाम् ।
निर्झरधाराश्रद्धालुकेन शीर्षं वनगजेन ॥

( ड ) बहुतेक गाथा शृंगाररसप्रधान असल्यामुळें आलिंगन–चुंबन–पुरुषायितादि प्रकारांचें वात्स्यायनकामसूत्राच्या आधारें गंगाधरभट्टानें टीकेंत स्पष्टीकरण केलें आहे. गाथांतील एतद्विषयक वर्णनें कामसूत्रास धरून आहेत. गाथाकाळीं जरी वात्स्यायनप्रणीत कामसूत्र नव्हतें, तरी तत्पूर्वी या विषयावर अनेक प्रणेते होऊन गेले ही गोष्ट वात्स्यायनानें औद्दालकि, घोटकमुख, गोनर्दीय वगैरे पूर्वाचार्यांचा उल्लेख केला आहे त्याच्यावरून समजून येतें. औचित्यभंगदोषास्तव या बाबतींत अधिक विवेचन करतां येत नाहीं.

या काव्यावर जर्मन विद्वानांनीं बरीच चर्चा केली आहे परंतु ते ग्रंथ जर्मन भाषेंत असल्यामुळें त्यांचा उपयोग करितां आला नाहीं.

गच्छतः स्खलनं क्वापि भवत्येव प्रमादतः ।
हसन्ति दुर्जनास्तत्र समादधति सज्जनाः ॥

———

# अर्वाचीन उपनिषदें व त्यांतील तत्वज्ञान*

( लेखकः—प्रो. कृ. वें. गजेंद्रगडकर, नाशीक )

बृहदारण्यकछांदोग्यादि प्राचीन उपनिषदें, व 'बृहज्जाबाल, नारदपरिव्राजकादि अर्वाचीन उपनिषदें, यांचा काल ठरविणें अत्यंत कठिण काम आहे. कारण अर्वाचीन उपनिषत्कालीं वाङ्मयचौर्याची लोकांना बरीच संवय होती असें दिसतें. आरुणी, याज्ञवल्क्य इत्यादि सुप्रसिद्ध तत्त्ववेत्त्यांच्या नांवावर वाटेल तीं मतें अनेक उपनिषदांत दडपून दिलीं आहेत. मात्र या अभिनव उपनिषत्कारांची आपल्या नांवापेक्षां आपल्या मताचाच प्रसार जास्त व्हावा अशी इच्छा असावी असें दिसतें. व म्हणूनच त्यांनीं आपलें नांव लपवून ठेवलें असावें. याप्रमाणें वाटेल तीं मतें प्रमुख ऋषींच्या नांवावर प्रतिपादिल्यामुळें त्यांचीं स्वतःचीं मतें कोणतीं, व दुसऱ्याचीं कोणतीं, त्यांचा खरा काल कोणता, कोणतें उपनिषद प्राचीन, व कोणतें अर्वाचीन मानावें, का 'याज्ञवल्क्य' 'आरुणी' हीं 'व्यासा' प्रमाणेंच विशेषनामें नसून सामान्य नामेंच आहेत, असे अनेक प्रश्न उपस्थित होऊन कालनिर्णयाचा प्रश्न फारच गुंतागुंतीचा झाला आहे. त्यांत उपनिषदांची भाषाशैली व विवेचन-पद्धति सहज अनुकरणीय असल्यामुळें आपल्या मतांस महत्व यावें म्हणून किंवा कित्येकदां केवळ विनोदार्थ व उपहासार्थ (parody) गंभीर व सामान्य विषयहि उपनिषदाच्या धर्तीवर लिहून उपनिषदांच्या संख्येंत भर टाकणें कांहीं अवघड नाहीं, हें ख्रिस्तोपनिषत्, अकबरोपनिषत्, तालिचूडकोपनिषत्, स्वराज्योपनिषत्, इत्यादि अगदीं अलीकडच्या उपनिषदांवरून सहज सिद्ध होतें. उपनिषद्वाङ्मयांत प्रक्षिप्त भाग किती आहे, व मूळचा किती हेंहि कळण्यास मार्ग नाहीं. कारण वेद व प्राचीन उपनिषदांतील कांहीं भाग विसंगतपणें वाटेल तसे एकत्र करून महानारायणोपनिषदाप्रमाणें कांहीं उपनिषदें तयार झालीं आहेत. याप्रमाणें कालनिर्णयाचा प्रश्न अत्यंत बिकट असला तरी प्राचीन उपनिषद कोणतें, अर्वाचीन कोणतें, हें ठरविण्यास पुढील साधनांचा थोडा बहुत उपयोग होइल असें वाटतें:—

१ प्राचीन उपनिषदांची भाषा आर्ष आहे; त्यांत ब्राह्मणांप्रमाणें विचित्र व अर्थहीन शब्दव्युत्पत्ति दिली आहे; अर्वाचीन उपनिषदांची भाषा सोपी व सरळ, व कित्येकांची तर काव्यमय आहे. उदाहरणार्थ—सौभाग्यलक्ष्मी उपनिषदांत 'नमामि यामिनी-नाथ-लेखालंकृत-कुंतलाम्' असें देवीचें वर्णन दिलें आहे.

* श्रीमंत कै. श्रीनिवासराव महाराज, औंधकर यांच्या उत्सवप्रसंगीं दिलेल्या व्याख्यानांतील प्रास्ताविक भाग आहे.

२ जगासंबंधी किंवा अंतिमसत्यासंबंधी स्वतंत्र व नवीन उपपत्ति देण्याचा अर्वाचीन उपनिषदांचा उद्देश नसून वेदान्ताचीं तत्वें सर्वलोकांना सहज समजावून सांगणें हा त्यांचा मुख्य हेतू असल्यामुळें अर्वाचीन उपनिषदांची भाषा साधी व सोपी असावी हें साहजिक आहे.

३ ज्या उपनिषदांत प्राचीन मानलेल्या बृहदारण्यकादि उपनिषदांचा किंवा त्यांतील विशिष्ट मतांचा उल्लेख केला असेल ते उपनिषत् अर्वाचीन मानावयास कांहीं हरकत नाहीं.

४ कांहीं विचार व कल्पना अर्वाचीन आहेत असें आतां सिद्ध झालें आहे. असे विचार किंवा अशा कल्पना ज्या उपनिषदांत प्रतिपादिल्या असतील तें उपनिषत् अर्वाचीन समजावें. उदाहरणार्थ–गणपति, रामकृष्णादि देव, व त्यांची भक्ति ( गणपत्युपनिषत्, सूर्योपनिषत्, रामोपनिषत् इ० ) या विषयीं ज्या उपनिषदांत वर्णन असेल तीं अर्वाचीन होत. पांच मुख्य देवांची म्हणजे पंचायतनाची कल्पना अर्वाचीन आहे. केवळ नामस्मरणानें मोक्षप्राप्ती होते ही कलिसंतरणोपनिषदांतील कल्पना भक्तिसांप्रदायानंतरची, व म्हणून अर्वाचीन आहे. त्याचप्रमाणें तंत्रादिशाक्तकल्पनाहि अर्वाचीनच आहेत.

५ बृहदारण्यकादि प्राचीन उपनिषदांत सुषुप्तीसंबंधीं जी उपपत्ति दिली आहे ती कशी चुकीची आहे हें कांहीं अर्वाचीन उपनिषदांत दाखविलें आहे. गाढ झोपेंत जीव ब्रह्माशीं एक होऊन ब्रह्मानंदाचा अनुभव घेतो असें बृहदारण्यकोपनिषदांत म्हटलें आहे, तर मण्डलब्राह्मणोपनिषदांत सुषुप्ति व समाधि यांत जाणीवेमुळें उत्पन्न होणारा अत्यंत मोठा भेद सविस्तर दाखविला आहे. यावरून हें उपनिषत् अर्वाचीन असावें, असें दिसतें.

६ कांहीं उपनिषदांत विशिष्ट दर्शनकारांचीं मतें प्रतिपादिलीं आहेत. हीं उपनिषदें त्या त्या दर्शनाच्या कालीं लिहिलीं असावीं. दर्शनें हीं उपनिषदांपेक्षां अर्वाचीन आहेत. तेव्हां त्यांतील मतें प्रतिपादणारीं उपनिषदें अर्वाचीन असलीं पाहिजेत. उदाहरणार्थ–सर्व शैव व वैष्णव उपनिषदें, योग उपनिषदें, व संन्यास उपनिषदें, अर्वाचीन असावीं हें उघड आहे. 'स्वसंवेद्य' उपनिषदांत महायान बुद्धांचें तत्व प्रतिपादिलें आहे. तेव्हां तेंहि अर्वाचीनच असावें.

७ मनुष्याची शास्त्रांत प्रगती होऊं लागली व विचाराच्या वाढीमुळें उपजतच कुतूहल व आश्चर्यपूर्ण जिज्ञासा कमी होऊं लागली, कीं कल्पनाशक्तिहि कमी होऊं लागते. व म्हणूनच बृहदारण्यकांतील अश्वाच्या वर्णनासारखें, किंवा मोहोळाच्या वर्णनासारखें वहारीचें वर्णन अर्वाचीन उपनिषदांत क्वचितच दिसून येतें. प्राचीन उपनिषदांतील कल्पनेच्या भराऱ्या व असाधारणत्व, अर्वाचीन उपनिषदांत नाहीं. यावरूनहि अर्वाचीन उपनिषदें कोणतीं हें साधारणपणें ठरवितां येईल.

८ मनुष्याचें व्यवहाराकडे लक्ष लागलें म्हणजे त्यास सृष्टिनिर्माणशास्त्र, परलोक-विद्या इत्यादि शास्त्रांचें महत्त्व मुळींच वाटत नाहीं व नीति, मानसशास्त्र यांविषयीं जास्त आवड उत्पन्न होते. म्हणून अर्वाचीन उपनिषदांत नीतिशास्त्र, गर्भविकासशास्त्र, व शारीर आणि मानस या शास्त्रांचा ऊहापोह विशेष विस्तारानें केला आहे. बौद्ध लोकांच्या तत्वज्ञानाचा अर्वाचीन उपनिषत्कारांच्या मनावर परिणाम झाल्यामुळें संन्यास मार्गास त्यांच्या दृष्टीनें जास्त महत्व आलें. म्हणून संन्यास प्रतिपादणारीं अनेक अर्वाचीन उप-निषदें लिहिलीं असावींत. याविरुद्ध प्राचीन उपनिषदांत संपत्ति व आत्मज्ञान दोन्ही सारखींच महत्वाचीं व आवश्यक मानणाऱ्या 'उभयमेव सम्राट्' म्हणणाऱ्या याज्ञव-ल्क्याची मानवी आयुष्याच्या ध्येयाची कल्पना जास्त पूर्ण होती असें म्हणावें लागतें. संन्यासाचें विशेष वर्णन असलें कीं, तें उपनिषत् अर्वाचीन असावें असें मानल्यास फारशी चूक होणार नाहीं.

९ शेवटीं, कांहीं उपनिषदांत सर्वसारसंग्राहकवृत्ति दिसून येते. व वेदांत, सांख्य, योग, भक्ति इत्यादि अनेक वादांतील तत्वें एकत्र करून त्यांचें विवेचन कांहीं उपनिषदांत केलें आहे. हीं उपनिषदेंहि अर्वाचीनच होत.

उपनिषदांच्या कालनिर्णयापेक्षांहि त्यांची संख्या निश्चितपणें ठरविणें जास्त कठीण आहे. कांहीं लेखकांच्या मतें हीं उपनिषदें अनंत असून त्यांची गणना करणें कोणाहि मानवी प्राण्यास शक्य नाहीं; तर कांहींच्या मतें हीं १००० तर कांहींच्या मतें २७२ आहेत. मुक्तिकोपनिषदांत दिलेली उपनिषदांची याद कालक्रमानुवार किंवा तर्कशास्त्रशुद्धहि नाहीं; म्हणजे त्यांतील उपनिषदांचा क्रम विचाराच्या वाढीप्रमाणें ठरवून त्याप्रमाणें उपनिषदांचीं नांवें दिलीं नाहींत. तथापि, बहुतेक महत्वाचीं अर्वा-चीन उपनिषदें त्यांत दिलीं आहेत असें मानण्यास हरकत नाहीं. त्या सर्वांचा येथें स्वतंत्र व पृथक् विचार करणें शक्य नाहीं. पण त्यांतील मुख्य तात्विक प्रश्नांचा विचार करतां येण्यासारखा आहे. ह्या दृष्टीनें पहातां त्यांत पुढील विषय अत्यंत महत्त्वाचे वाटतात. १ कर्मकांड व देवतावर्णन २ सृष्टिनिर्माणशास्त्र ३ मानसशास्त्र ४ तत्वविवेचन ५ नीतिशास्त्र व अनुभवशास्त्र.

---

# अभिप्राय

**सुमनहारः—** श्रीमंत सौ. मातुश्री महाराणी चंद्रावतीबाईसाहेब होळकर यांनीं इंदूर–महाराष्ट्र–साहित्यसभेच्या विनंतीस मान देऊन श्रीमंत महाराज सवाई यशवंतराव होळकर यांच्या एकविसाव्या जन्मदिवसाप्रीत्यर्थ एक काव्य-गुच्छ प्रसिद्ध करण्यासाठीं ३५० रुपयांची देणगी मंजूर करून सदर काव्यगुच्छ काढण्याविषयीं सभेस आज्ञा केली. 'सुमनहार' तिचें दृश्य फल होय. यांतील कवितांची निवड सुप्रसिद्ध रसिक कवि रा. रा. नरहर शंकर राहाळकर यांनीं केली आहे व ती त्यांच्या लौकिकास साजेल अशी आहे. तीन कवयित्री व सतरा कवि इतक्यांचीं ८२ लघुकाव्यें या हारांत गुंफिलीं आहेत. टोपणनांवाचे कवि दोन व कवयित्री एक असून कवयित्रींमध्यें एक सौभाग्यवती, एक श्रीमती व एक कुमारिका असे सर्व प्रकार आहेत. तांबे, देवधर, राहाळकर इत्यादि माळव्यांतील प्रसिद्ध कवींच्या कविता या पुस्तकांत मुळींच नाहींत ही एक उणीव भासते. आपटे, काळेले, कुलकर्णी, शिराळकर वगैरेंचे बहुतेक उतारे सुंदर व वाचनीय आहेत. कविमित्रांचे विषय व त्यांची रचना त्यांना शोभेल अशी आहे. हाराचा आरंभ श्री. अहल्यादेवी होळकर यांच्यावरील कवनानें झाला आहे. मध्याला 'तरुणांना उपदेश' ही कविता आहे. आणि शेवटीं महाराष्ट्राशीं परिचित असलेले प्रो. परशुरामपंत पाटणकर यांचा 'विश्वनाटक' हा उतारा आहे. आदिमध्यावसानींचा हा सुयोग सहजगत्या घडून आला आहे. ईश्वर, सृष्टि, भावना, कला हे उताऱ्यांचे विषय असून त्यांत वृत्तवैचित्र्यहि आढळतें. सुमनहारांत कांहीं दोष दृष्टीस पडतात. अब्रू, हिस्सा अशासारखे काव्याला न मानवणारे शब्द यांत आहेत. पुढें संयोग असतां मागल्याला गुरुत्व दिलेलें नाहीं; जसे 'मंजुलस्वरें' (पृ. १४४), 'राहील त्वन्मंदिरीं' (पृ. ३९). कांहीं अशुद्ध व कर्णकटु शब्द आढळतात. जसें 'विन्मुख' (पृ. ५०), 'स्विकरि' (पृ. १७), 'औदासिन्य' (पृ. ८), 'त्वदिय,' (पृ. ६८), 'निद्रिस्त' (पृ. ५०). कोठें संयोग नसतां तो मानला आहे. उ. 'श्रीशकृपा' (पृ. ४५) यांत 'कृ' संयुक्त नसून 'श' वर आघात मानला आहे. 'नी' (पृ. ६५) व 'नित' (पृ. ५७) हे नागर प्रयोग नव्हत. 'विश्वनाटक' प्रकरणांत रसांचीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यांत कित्येक ठिकाणीं रसाच्या स्थायिभावाचा निर्देश आहे. तो उचित नाहीं. त्यानें रसोत्पत्ति होत नसून केवळ रसाभास मात्र उत्पन्न होतो. आरंभीं मंगलाशीर्वादांत श्री. सवाई यशवंतराव यांस उपदेश आहे. तो त्यांच्या आचरणांत फलद्रूप व्हावा अशी आमच्याप्रमाणें सर्वांचीच इच्छा असणार. एकंदरींत सुमनहार हें पुस्तक वाचनीय व संग्राह्य आहे.

**लक्ष्मणशास्त्री लेले**

अनुक्रमणिका

# अश्वघोषानें लिहिलेलें गौतम बुद्धाचें चरित्र

( लेखकः – श्रीयुत केशवराव आप्पा पाध्ये, हायकोर्ट वकील, सेक्रेटरी बुद्ध सोसायटी.)

इसवी सनाच्या १ ल्या शतकांत भरतखंडांत कनिष्क नांवाचा वैभवशाली व महापराक्रमी राजा राज्य करीत होता. त्याच्या पदरीं अश्वघोष ह्या नांवाचा एक महापंडित व प्रतिभासंपन्न कवि होता. अश्वघोष हा जन्मतः सनातन वैदिक धर्माचा अनुयायी होता. परंतु पुढें त्यानें बुद्धधर्माचा स्वीकार केला. कनिष्क राजा बुद्धधर्मीय असल्यामुळें अश्वघोषास त्याचें धर्मगुरुत्व साहजिक प्राप्त झालें. बुद्धधर्मासंबंधानें त्यानें अनेक ग्रंथ लिहिले आहेत. परंतु त्यानें संस्कृत भाषेंत गौतम बुद्धाचें पद्यात्मक चरित्र लिहिलें तें इतकें लोकप्रिय झालें कीं त्याचीं भाषांतरें चिनी, तिबेटी, व नेपाळी भाषांत करण्यांत आलीं. इ. सनाच्या सातव्या शतकांत प्रख्यात चिनी प्रवासी हुएन-स्यांग हा हिंदुस्थानांत आला होता. अश्वघोष, नागार्जुन, कुमारलब्ध व देव हे सर्व जगाला प्रकाशित करणारे चार सूर्य होऊन गेले, असें हुएन-स्यांग ह्यानें इ. स.६४५ सालीं हिंदुस्थान सोडतांना आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे. ईन्टस्यांग नांवाचा दुसरा एक चिनी प्रवासी इ. स. ६७३ सालीं हिंदुस्थानांत आला होता, त्यानेंहि अश्वघोषा-संबंधीं प्रशंसापर उद्‌गार काढले आहेत. 'बुद्धचरित'-काव्याखेरीज अश्वघोषानें अलंकार-शास्त्रावर एक ग्रंथ रचल्याचें ईन्टस्यांग ह्यानें आपल्या प्रवासवर्णनांत नमूद केलें आहे.

अश्वघोषाचें बुद्धचरित अनेक दृष्टींनीं फार महत्त्वाचें आहे. गौतम बुद्धानें आपल्या धर्ममतांचा प्रसार तत्कालीन लोकांत प्रचलित असलेल्या मागधी व पाली भाषेंत केला. बुद्धधर्माचे बहुतेक ग्रंथ पालीभाषेंत आहेत. गौतम बुद्धाचा जन्म इ. सनापूर्वी ५५७ व्या वर्षी एका वैभवशाली सूर्यवंशीय राजघराण्यांत झाला व इ. सनापूर्वी ४४७ व्या वर्षी त्याचें परिनिर्वाण झालें. त्याच्या हयातींत अगर त्याच्या पश्चात् सुमारें २००-२५० वर्षेपर्यंत त्याचें सांगोपांग चरित्र अगर त्याची धर्ममतें त्याच्या शिष्यवर्गाकडून संकलित रीतीनें लिहिलीं गेल्याचें आढळत नाहीं. त्याच्या पश्चात् सुमारें १०० वर्षांनीं वैशाली येथें व २८० वर्षांनीं पाटलीपुत्र येथें बुद्धभिक्षूंनीं अधिवेशनें भरविलीं होतीं. त्यावेळीं व निरनिराळ्या वेळीं लिहिल्या गेलेल्या 'सूत्रां' वरून व प्रचलित असलेल्या आख्यायिकांवरून गौतम बुद्धाचें संकलित चरित्र लिहिण्याचा प्रयत्न झाला. सम्राट् अशोकानें बुद्धाचीं धर्मतत्वें जागोजाग स्तूप उभारून त्यांजवर खोदविलीं, त्यामुळें भरतखंडांत बुद्धधर्ममतांचें बरेंच संरक्षण झालें. भरतखंडांतील लोकांची इति-हासलेखनाबद्दलची अनास्था प्रसिद्ध आहेच. सबंध संस्कृत वाङ्मयांत बिल्हण-काव्य, राजतरंगिणी व हर्षचरित ह्या तीन ग्रंथाखेरिज ऐतिहासिक ग्रंथ नाहींत असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. आमच्या देशांत घडून आलेल्या गोष्टींचा इतिहास

हुडकून काढण्यास आम्हांस ग्रीक, चीनी, फारशी वगैरे परदेशी लोकांनीं मिळविलेल्या माहितीकडे पहावें लागतें. हें देशाचें दुर्दैव होय! ह्या स्थितीच्या मानानें पाहिलें असतां अश्वघोषानें संस्कृतांत लिहिलेलें पद्यात्मक बुद्धचरित्र बरेंच विश्वसनीय आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कवींचें लाघव ऐतिहासिक सत्यास बऱ्याच अंशीं पोषक नसतें. ह्या सिद्धान्तास अनुसरून ह्या ग्रंथांत देखील कवीच्या निरंकुशत्वामुळें ऐतिहासिक सत्य बऱ्याच जागीं लुप्त झाल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. संस्कृतकाव्य ह्या दृष्टीनें अश्वघोषाचें बुद्धचरित फार मोठ्या दर्जाचें आहे. बुद्धचरिताची भाषा शुद्ध व सुबोध असून कवितेंत प्रसाद भरलेला आहे. निरनिराळ्या प्रसंगांचीं वर्णनें फार मनोहर असून रसपूर्ण आहेत. बुद्धकालीन भिन्न भिन्न मतवाद्यांबरोबर गौतम बुद्धांचे वादविवाद झाले त्यांचें दिग्दर्शन फार सुलभ रीतीनें केलें आहे. अश्वघोषानंतर भरतखंडांत निर्माण झालेल्या संस्कृत वाङ्मयावर बुद्धचरिताची बरीच छाप पडली आहे असें दिसतें. कालिदासानें रघुवंशाच्या सातव्या सर्गांत अजराजा स्वयंवराकरितां जात असतां त्यास पाहण्यासाठीं उत्सुक असलेल्या स्त्रियांचें वर्णन केलें आहे तें बुद्धचरितांतील तिसऱ्या सर्गांत युवराज गौतम राजरस्त्यांतून आपल्या परिवारासह जात असतांना त्यास पहाण्यासाठीं उत्सुक झालेल्या नगरनारींच्या मनोहर वर्णनाशीं तंतोतंत जुळत आहे. तसेंच कालिदासाच्या कुमारसंभवमहाकाव्यांतील शिवास आपल्या निश्चयापासून परावृत्त करण्यासाठीं मदनानें त्याजवर आपलें शरसंधान रोखून त्यास चीत करण्याचा प्रयत्न केला, त्यावेळचें कालिदासाचें हृदयंगम वर्णन व बुद्धचरितांतील तेराव्या अध्यायांत गौतमबुद्धाला आपल्या निश्चयापासून ढळविण्यासाठीं मार (कामदेव) ह्यानें जे जे उपाय केले त्याचें अश्वघोषानें केलेलें वर्णन, हीं दोन्ही वाचकांनीं परस्परांशीं ताडून पाहिलीं असतां आमच्या म्हणण्याची यथार्थता त्यांस पटल्यावांचून राहणार नाहीं.

अश्वघोषाच्या बुद्धचरिताचे १७ सर्ग आहेत. पैकीं १ ते १३ मात्र अश्वघोषाच्या लेखणींतून उतरले आहेत. बाकीचे १४ ते १७ सर्ग अमृतानंद नांवाच्या एका नेपाळीसंस्कृत कर्त्यानें लिहिले असल्याबद्दल पुरावा आहे. ह्या १७ सर्गांत, बुद्धाच्या जन्मापासून त्याला जन्म–जरा–मरण ह्यांपासून कायमची मुक्तता करुन देणारें धर्मचक्र लाभल्यापर्यंतची हकीकत आहे. अश्वघोषचरित्राची तिबेटी भाषेंत जी प्रत आहे त्यांत २५ सर्ग असून त्यांत बुद्धाच्या जन्मापासून त्याचें परिवर्तन होई तोंपर्यंतची समग्र हकीकत आहे. तिबेटी भाषेंतील बुद्धचरिताचें इंग्रेजी भाषेंत अद्याप रूपांतर झालें नाहीं.

अश्वघोषाच्या पहिल्या सर्गांत बुद्धाच्या जन्माची हकीकत दिली आहे. सूर्यवंशीय शाक्यकुळांतील मगध देशावर राज्यकरणाऱ्या शुद्धोदन राजाच्या पोटीं त्याचा जन्म झाला. त्याच्या आईचें नांव मायादेवी असें होतें. ती केवळ धर्माची मूर्तिच होती असें तिचें कवीनें वर्णन केलें आहे. बुद्धाच्या जन्मापूर्वीं तिला ३२ महिनेपर्यंत

कौमार्यव्रत पाळण्याबद्दल देवांची अनुज्ञा झाली होती. रामजन्मापूर्वी ज्याप्रमाणें कौसल्येस अगर खिस्तजन्मापूर्वी ज्याप्रमाणें त्याची आई मेरी हिला आपल्या भावी मुलाच्या अलौकिक महाकृत्यांबद्दल आगाऊ सुचिन्हें दिसलीं, त्याप्रमाणेंच मायादेवी हिला आपल्या पोटीं निपजणाऱ्या मुलासंबंधीं शुभ चिन्हें दिसलीं.

बुद्धाचा जन्म झाल्यावर थोड्याच दिवसांनीं असित नांवाचे एक महर्षि शुद्धोदन राजाकडे येऊन त्यास प्राप्त झालेल्या पुत्राचें मुखावलोकन करण्याबद्दलची आपली इच्छा त्यानें प्रदर्शित केली. शुद्धोदन राजानें महर्षि असिताच्या थोर पदवीस साजेल असें त्यांचें आतिथ्य करून त्यांस आपलें पुत्ररत्न दाखविलें. त्यास पाहून महर्षि असित चिंतातुर झाल्याचें अवलोकून शुद्धोदनास विषाद वाटला. नूतन जन्मलेल्या युवराजास पाहून महर्षींच्या मनःस्थितींत एकाएकीं फरक झाल्याचें पाहून राजानें त्यास त्याबद्दलचें कारण विचारलें व आपल्यास नूतन प्राप्त झालेल्या मुलाचे जीवास कांहीं धोका आहे किंवा कसें असा त्यास प्रश्न केला. महर्षि असितानें सांगितलें कीं तुझ्या मुलाच्या जीवास कांहीं धोका आहे ह्या विचारानें माझें मन उद्विग्न झालें नव्हतें. परंतु अखिल मानव जातीला जन्म, जरा, मरणाच्या फेऱ्यांतून कायमचें मुक्त करण्यासाठीं ह्या मुलाचा अवतार झाला आहे. ह्या विचारांत माझें मन आनंदांत क्षणैक दंग झालें होतें.

शुद्धोदनानें पुनःपुनः खोदून विचारलें कीं, माझ्या मुलाच्या भावी आयुष्यक्रमांत अशी काय जादू भरली आहे कीं, आपल्या सारख्या महर्षीचें मन तल्लीन होऊन जावें ! ! महर्षि असितानें प्रत्युत्तर केलें कीं, तुला प्राप्त झालेला मुलगा सर्व राज्यलक्ष्मीचा व संसारसुखाचा त्याग करून मोठ्या परिश्रमानें भवसागरांतून कायमची मुक्तता करण्याची गुरुकिल्ली शोधून काढील व अविद्यारूपी अज्ञानाचा आपणांस लाभलेल्या ज्ञानदीपाच्या साहाय्यानें नाश करील. मानवजातीचें आयुष्य दुःखानें भरलेलें आहे. जरा, व्याधि, मरण ह्यांनीं तें गुरफटलेलें आहे. जन्ममरणाच्या पुनः पुनः येणाऱ्या असंख्य फेऱ्यांतून आपल्या जीवाची कायमची सुटका करून घेण्याबद्दलचा मार्ग तो शोधून काढील. तसेंच ह्या जगांतील दुःखानें संतप्त झालेले मानव, ज्ञानजलानें तुडुंब भरलेल्या धर्मचक्ररूपी गंगेंतील पाणी पिऊन आपली तहान कायमची भागवितील. ग्रीष्मऋतूच्या अखेरीस मेघ आपल्या वर्षावानें ज्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रास गार करितात त्याप्रमाणें प्रापंचिक वस्तुरूपी इन्धनानें प्रज्वलित झालेल्या इच्छारूपी अग्नीला तुझा मुलगा आपल्या धर्मचक्राच्या जोरावर शांत करील.

ह्या आशयाचें भाषण करून असित महर्षि शुद्धोदनाची रजा घेऊन परत गेले. राजा शुद्धोदनाची आपल्या मुला संबंधानें तात्पुरती काळजी जरी दूर झाली तरी महर्षि असितानें पुत्राबद्दल जें भविष्य कथन केलें त्यामुळें त्यास आनंद होण्याऐवजीं कायमची चिंता प्राप्त झाली. ह्या सर्गांत बुद्धाच्या जन्माचें वर्णन केलें आहे तें नव्या करारांतील येशूख्रिस्ताच्या जन्माचे वर्णनाशीं बव्हंशीं जुळत आहे.

मायादेवीस ज्याप्रमाणें कौमार्यव्रत पाळण्याची अनुज्ञा झाली होती त्याप्रमाणें जीजसच्या मातुश्री मेरी हिलाहि झाली होती. बुद्धचरितांतील असित महर्षीनें ज्याप्रमाणें बुद्धासंबंधीं भाकित केलें त्याप्रमाणें बायबलांत सायमन ह्यानें जीजसच्या वडिलांस सांगितलें होतें. ह्या सर्गांत जनक, सुराचा नातु (श्रीकृष्ण), असित वगैरे विभूतींचा उल्लेख आहे. भवचक्रांतून पार पडण्यासाठीं ज्या साधनांचा गौतम बुद्धास लाभ झाला तो त्यांना झाला नाहीं असें ह्या सर्गांत ध्वनित केलें आहे. येशूक्रिस्त व गौतम बुद्ध ह्या उभयतांच्या जन्मकथेबद्दल सर्वांशीं साधर्म्य असल्यामुळें क्रिस्ताचें चरित्र गौतम बुद्धाच्या चरित्राचा जणूं अनुवादच आहे असें वाटतें.

---

## नाशिक नगर-संमेलन २ रें

नाशिक व नगर या दोन जिल्ह्यांतील वाङ्मयोपासक संस्थांतर्फे नाशिक येथें दुसरें साहित्यसंमेलन ता. १९ जानेवारी स. १९३० रोजीं भरलें हें आतां सर्वांस विदित झालेंच आहे. अध्यक्षस्थानीं नगरचे रा. ब. नरहर बाळकृष्ण देशमुख यांची योजना झाली होती. सभेस नगर, संगमनेर, कोपरगांव वगैरे परठिकाणांहून सुमारें ५० वाङ्मयप्रेमी आले होते. निरनिराळ्या धंद्यांची सुमारें ५०० मंडळी संमेलनास हजर होती. अशाप्रकारचीं संमेलनें वाङ्मयविषयक अभिरुचि वाढविण्यास कारणीभूत होतात या दृष्टीनें या संमेलनांचें महत्त्व फार आहे. किंबहुना अध्यक्षांनीं म्हटल्याप्रमाणें दर जिल्ह्यांत असें संमेलन भरलें तरी हवेंच आहे. या संमेलनांत नाट्यसृष्टी, भाषेचें शुद्धीकरण, वाङ्मयोपासना व अभिवृद्धि अशा विषयावर चर्चा झाली ही आनंदाची गोष्ट आहे. शिवाय म. सा. संमेलनाच्या शुद्धलेखनकमिटीस मदत म्हणून स्थानिक शुद्धलेखनकमिट्या नेमण्यांत आल्या. नाशिक नगर जिल्ह्यांत लोकांच्या उच्चारांत अनुस्वार येतात कीं नाहीं यविषयीं या कमिट्यांनीं आपला अभिप्राय दिल्यास मुख्य कमिटीचें काम फार सुकर होईल. असो या अधिवेशनांत जप्त झालेल्या पुस्तकांवरील जप्ती दूर करणें, अश्लील वाङ्मयाला प्रतिबंध घालणें, मराठीचा सरकारी विद्यापीठाच्या कांहीं परीक्षांच्या अध्ययनक्रमांत समावेश करणें, मराठी ट्रेनिंग कालेजांतून तिसऱ्या वर्षाचा कोर्स सुरू करणें वगैरे ठराव पास झाले. संमेलन चांगल्या रीतीनें पार पडलें हें सांगावयास नकोच.

**स्वैरालापः**—(प्रकाशक श्रीधर सखाराम पंडित, शास्त्री हॉल, ग्रँटरोड, मुंबई किं. ६ आणे.) या ३१ पानांच्या पुस्तकांत निरनिराळ्या २९ विषयांवर कवीनें पद्यरचना केली आहे. जीवकुडीसंवाद, संपत्ती आणि सौंदर्य, विजयी कोण, सुखमय संसार, व विधवाविलाप वगैरे कविता वाचनीय आहेत.

# मासे व त्यांच्या जाती

आपल्याकडे मच्छीमारीच्या धंद्याचें शिष्टीकरण केलें गेलें नसल्यानें तो धंदा अत्यंत किफायतशीर असूनहि फार खालावला आहे. आज बहुधां अगदीं अडाणी जातींच्या हातांत तो असून त्याची वास्तपुस्त करण्याची जरुरी सरकारला किंवा लोकांनाहि मुळींच भासत नाहीं. पाश्चात्य देशांतून माशांचा फारच मोठा व्यापार चालतो व माशांची योग्य पैदास कशी करावी याचें शास्त्र तिकडे उत्तम अवगत आहे.

माशांच्या बारा तेरा हजार जाती किंवा प्रकार आहेत. त्यांपैकीं आपल्या सुशिक्षितांना बोटावर मोजण्याइतक्या सुद्धां माहीत नाहींत; व माशांचें जीवन कसें असतें याचीहि कल्पना नाहीं. कोळी, भोई, दालदी या जातींचा धंदा मासे पकडून विकण्याचा असल्यानें त्यांना बऱ्याच देशी जाती माहीत असतात. अशाच कांहीं जातींच्या लोकांकडून पुढील संग्रह जमविला आहे. पण तोंडीं सांगतांना व लिहून घेतांना बऱ्याच चुका झालेल्या असण्याचा संभव आहे. तेव्हां जातींचीं नांवें सर्वच बरोबर असतील असें नाहीं. याशिवाय येथें दिलेल्या जातींहून इतर अनेक जाती असतील. तसेंच मासे धरण्याचे प्रकार व साधनेंहि कितीतरी असतील. माशांचे खाण्याचे पदार्थ जे करतात त्यांचीं नांवें देखील सर्व मिळालीं नाहींत. याचें मुख्य कारण माशांशीं निकट संबंध असणाऱ्या माणसांची गांठ पडत नाहीं व पडली तरी त्यांच्याकडून हवी तशी माहिती मिळत नाहीं. असो. हा शब्दसंग्रह पाहून कोणाला यांत भर घालावीशी वाटली किंवा दुरुस्ती सुचवावीशी वाटली तरी आमचें काम झालें असें समजेन.

**चिंतामण गणेश कर्वे,**
संपादक, महाराष्ट्र शब्दकोश.

## माशांच्या जातीः—

(अ) सांवतवाडीकडील—

शेतुकें, फातक्या, कलावंते, चांदण्या } लहान जातीचे मासे.

दांडई=लांबट लहान मासा.

खवळा=चमकदार (तीन इंचांपर्यंत वाढणारा) मासा.

शेंगाळ्या=शेंगेप्रमाणें कांटे असणारा मासा.

डेंबुक=बुळबुळीत अंगाचा (अंगठ्याएवढा) मासा. हा चिखलांत असतो.

खर्चा=रेतींतला सफेत रंगाचा चवदार मासा.

हैर=सापासारखा मासा. (याला धरून अंगाला चण्याचें पीठ लावतात व त्याच्या

गोळ्या करून ठेवतात. या गोळ्या औषधी आहेत).

काडी=अंगावर करवतीप्रमाणें कांटे असणारा सर्पाकृती मासा.

वाळई=चपट्या जातीचा खडपांच्या ढोलींत राहणारा मासा.

मळवा=दगडावरचा मळ खाणारा बोटासारखा मासा.

मुरंगी=तोंडाला लाल रंग असणारा लहान मासा. हा स्वादिष्ट असतो.

ठिगुर=डेंबुक जातीचा मोठा मासा.

चांदा=डोक्यावर श्वेत टिकल्या असलेला लहान मासा. हा कांठाला असतो.

मरळ=डेंबुक जातीचा फार मोठा मासा. हा मोठ्या मेजवानीला योग्य समजतात.

या माशांच्या पैदासीसंबंधीं एक पुस्तक बडोदेसंस्थाननें प्रसिद्ध केलें आहे.

(आ) आलीबागकडील—

पाकट किंवा वागळ=याच्या शेंपटीला दोन्ही बाजूंना करवतीच्या दांत्यासारख्या पट्ट्या असून त्या मांजराच्या नखांप्रमाणें आंतबाहेर करतां येतात. धरणाराच्या अंगाला या दांत्यांनीं ओरबाडतो; व फार विषारी जखम करतो. फटकाऱ्यानें झाडें सुद्धां मरतात.

(इ) रत्नागिरीकडील—

कोंडे, मलिद=पाणसाप मासा

गेणी=हा फार लांब (दोन तीन पुरुष?) असतो. पांचदहा मण तेल निघतें. तें अवजारांना लावतात.

नाली=लहान मासा.

मूळा=इमारतीच्या चुन्यांत याच्या शिंपा घालतात.

सुरमाय=हातभर लांब मासा. वादळांत सांपडत नाहीं.

हालवा=सुरमायहून लहान.

पापलेट=तळहाताएवढा मासा.

पुका=हातभर लांब मासा

पालव= ,, ,, ,,

भिंग= ,, ,, ,,

करली=दीड हात लांब मासा

बांगडा करटा=दीडवीत लांब

शिंगाळों= ,,

मुशी= ,,

शेवण= ,,

गुंज=हा पावसाच्या आरंभीं उडतो.

काडबा=हा संथ पाण्यांत नसतो.

पुढील मासे आक्टोबर-नोव्हेंबरच्या सुमारास पकडतात.—

सुरम, कुर्ती, मोआ, कोकर, करेळ, जांबोस, लातर, वळवास, वळशिंगटी, काणे, गोब, कांट, बुकडुल, कवळी, दंडोतर, बाट, बोंबील, विर्ज, जोकी, पटोळडी, बसकल, चंडगो, सातारो, इत्यादि.

यावरील माशांतून मीठ भरून विकतात.

इतर मासेः—मुशी, वाघली, घोळ, दागोळ, इस्वाळ, सरम, करली, शिंगाळ, रावस, गेडर, पलो, बिंग, सरगे, पळु, कोटब, शिंगटी, दोरी, बाट, मोठी बोई, रेणवी, कातर, लहान झारटी, चेरबोट, करकरो, मेछनी, लेप, सिवु, बंगड, शितक, मुर्डु, कार, जवास, कारी, मेच, कावटी, गोलीम, कांचेक, कज, बोकेर, माज, कुंबाड, चिंगळ,

हेड ( हा वाळविला म्हणजे त्यास कुटी म्हणतात व त्याचें खत होतें ), माकुल, कुर्रें, ताडस, पालु, वालशिंगटें, लाजो, ताली, वागळी, कानटे, मण्यारो, शिर्वो, चिंगुळ, कांची, घावो, हैद, सरंगा वगैरे, वगैरे.

(ई) देशावर (पुण्याकडे) माहीत असणाऱ्या कांहीं जाती—

सोडा=एक जात.

चिंगळ=लहान जात.

पाडी=हा गोड्या पाण्यांत असतो.

पामलेट ( पापलिष्ट )=समुद्रांतला पांढरा मासा.

आमल्या=बोटाएवढे मासे.

## माशांचे अवयवः—

खवळ ( सांवतवाडी )=माशांच्या अंगावरील चकचकीत 'कवल्या' (खवले).

अवग (सांवतवाडी)=माशाचें हृदय आणि फुफ्फुस एवढाच भाग.

गाबाळी=माशाच्या पोटांतली अंड्यांची जाळी.

कल्ले=तोंडाजवळचे पंख (पांखे), यांनीं मासा श्वासोच्छास करतो.

वल्हीं=वल्ह्याप्रमाणें पाय यांनीं माशाला पोहतां येतें.

## मासे धरण्याचीं साधनें व क्रियाः—

मेण घालणें (सांवतवाडी)=मासे धरण्याकरितां त्रिफळें, गेळे, तिवसकांडे कुटून पाण्यांत घालतात ती क्रिया.

आंखें (सांवतवाडी)=मासे धरण्याकरितां वेळूच्या काठीला अर्धवर्तुळाकृती लाव-लेलें जाळें.

वेंड ( सांवतवाडी )=दोन काठ्यांमध्यें अडकविलेलें जाळें.

जावळी (सांवतवाडी)=मासे वगैरे ठेवण्याकरितां केलेली 'पडली' (परडी).

दिलवर (रत्नागिरी)=एक प्रकारचें जाळें. १५ ते ५० पुरुष पाण्यांत हें लाव-तात. खालीं जड वजन असतें.

जाळ्यांचे इतर प्रकारः—वांघुळ, माउद, घण, वावरी, पाल, पालुपाग, करब-पाग, शिंगटापाग, कांदाळ, होग, दोरपाग, घनपाग, बांगडीपाग, कांकणीपाग, दोन बोवटीपाग, कावळेपाग, गोलमिंद, थलीपाग, कानचेकपाग, औत, कडपापाग, दंडीइंद, इत्यादि. [प्रथम हीं जाळीं पाण्यांत टाकण्यापूर्वीं सिमेंट मिसळलेल्या पाण्यांत उकळतात व मग चुन्यानें (शिंपाच्या) माखतात व वाळवतात. नंतर ऐनाच्या सालीच्या रसांत रंग-वितात. हीं जाळीं एक वर्षावर टिकतात.]

आमिष=मासे पकडण्यासाठीं गळाला जो खाण्याचा पदार्थ--विशेषतः पिठाच्या गोळ्या--लाविलेला असतो तो.

गळ—मासे पकडण्याठीं केलेला हूक.

माशांचे केलेले खाण्यांतील प्रकारः—

लव्हाई (सांवतवाडी)=माशांचा 'खंका' (तुकडा किंवा फोडी.)
मोवरें (सांवतवाडी)=खाण्याची मच्छी.
बोंबील=एक वाळविलेला मासा, किंवा त्याचा कुटा.
मासळी=विकण्याकरितां ठेवलेले मासे. माशांची जुडी.
सुकट=वाळविलेलें बोंबिल.
खारामासा=खारावलेला मासा.

---

## म्हणी

( १ ) शब्दांचा सुकाळ तेथें बुद्धीचा दुकाळ.
( २ ) ज्याची खावी भाकरी त्याची करावी चाकरी.
( ३ ) तान्हेली गाय चिखल खाय.
( ४ ) देव होता पाठमोरा नसती विघ्नें येती घरा.
( ५ ) नांव असे उदार कर्ण, कवडी देतां जाई प्राण.
( ६ ) पचेल तें खावें, रुचेल तें बोलावें, शोभेल तें ल्यावें.
( ७ ) पळणाराला एक वाट, शोधणाराला बारा वाटा.
( ८ ) पापाचा बाप पैका.
( ९ ) पोटासाठीं केलें सोंग तेथें कैचा पांडुरंग.
( १० ) फाटकें नेसावें पण स्वतंत्र असावें.
( ११ ) फुकट दर्शन देवळांत दाटी.
( १२ ) प्रयत्नावांचून प्रारब्ध लंगडे.
( १३ ) बळाचा वळकट तो धीराचा खोटा.
( १४ ) बायको भली तर नवरा भला.
( १५ ) बायको वेडी, पोर पिसें, जावई मिळाले तेही तसे.
( १६ ) बाहेर सांगे ब्रह्मज्ञान आंत करी मद्यपान.
( १७ ) मीपणा टाकशील तर देवपणा पावशील.
( १८ ) मूर्खाला कहाणी अन् उपड्या घडयावर पाणी.
( १९ ) यत्न जोडी आळस मोडी.
( २० ) लाज नाहीं मना कोणी कांहीं म्हणा.
( २१ ) सटवीनें लिहीलें भाळी, तें न चुकें कदा काळीं.
( २२ ) अग अग म्हशी मला कां ग नेशी.
( २३ ) अचाट खाणें अन् मसणांत जाणें.
( २४ ) अठरा पडो दळ, सांपडेना स्थळ.
( २५ ) अडल्याचा सारथी भगवान्.

महादेव विनायक डोंगरे, महाड.

## स्त्रियांच्या म्हणी

( मागील अंकावरुन पुढें चालू )

( १७३ ) बायको वेडी, मूल पिसं, जावई मिळाला, तो तसं.
( १७४ ) तोंड फिरे तिथं अवदसा फिरे.
( १७५ ) चिंबचळे शेतचं व खुळे थोटे पोटचं.
( १७६ ) चलेरे भुता, सवकल्या शेता.
( १७७ ) लाज नाहीं मना, मला कांहीं म्हणा.
( १७८ ) सख्खे भाऊ पक्के दायजी, सख्या जावा उभा दावा.
( १७९ ) म्हातारपणीं अन् ढोबळ म्हणी.
( १८० ) पोराच्या ढुंगणाला अन् चहाडाच्या तोंडाला धरबंद नाहीं.
( १८१ ) राळ्याचा भात पंक्तीला, म्हातारा नवरा गमतीला.
( १८२ ) अभिमानाची अन् मुब्या कानाची.
( १८३ ) राम तूं धनी, अन् शेजारीण पडली कणगीवाणी.
( १८४ ) आकाशांतून पडलं अन् धरणीवर सावरलं.
( १८५ ) लाज घातली भिजत अन् अक्कल घातली शिजत.
( १८६ ) तेरा राग, मेरा संतोष.
( १८७ ) ज्यांनीं नाहीं देखला आवा, त्यांनीं देखला दिवा.
( १८८ ) जेवायला आधीं, निजायला मधीं, कामाला कधींबिधीं.
( १८९ ) विकतची कळ, पादत पळ.
( १९० ) कोडग्या कोडग्या लाज नाहीं,कालचें बोलणें आज नाहीं.
( १९१ ) उलाढाली डिकेमाली (?).
( १९२ ) मेल्या माती जित्या रोटी.
( १९३ ) हौसेनें केला पति, त्याला भरली रगतपिती.
( १९४ ) ढाक नाहीं ढगारा, फुटका नगारा.
( १९५ ) साठी बुद्धि नाठी, कुत्रें लागेल पाठीं.
( १९६ ) लोकाचं लेणं लेगलुचरे, मागायला आली देग कुत्रे.

नीलकंठ शंकर नवरे, सोलापूर.

# मराठीच्या "प्राकृत" भाषा

(लेखक:--प्र. धों. कानिटकर)

मराठीच्या प्राकृत भाषांचा विचार हा सामान्यतः शहरवासियांना खेड्यांतील लोकांच्या स्थितीचा विचार करणें जसें अनवश्यक वाटतें तसा वाटण्याचा संभव आहे. पण थोड्या विचारांतीं आपल्या संसाराचें फूल मनाजोगतें फुलणें हें खेड्यापाड्यांत राबणाऱ्यांच्या सुस्थितीवर अवलंबून आहे असें जसें दिसून येतें तसेंच मराठी भाषेचा आम्रवृक्ष फळाफुलांनीं डवरून जाऊन वाल्मिकीसारख्या कोकिळांचें निवासस्थान होण्यास त्याचीं मुळें प्राकृत भाषांच्या भूमींत दूरवर जाणें अवश्यक आहे असेंच दिसून येईल.

नगरवासी व ग्रामवासी किंवा वृक्ष आणि भूमि यांचा जितका जिव्हाळ्याचा संबंध तितकाच मराठी व मराठीच्या प्राकृत भाषा यांचा संबंध जिव्हाळ्याचा आहे. त्याप्रमाणें अगोदर नगरवासी कीं ग्रामवासी किंवा आधीं वृक्ष कीं बीं हा वाद जसा एका तऱ्हेनें न संपणारा आहे तसाच मराठी व तिच्या प्राकृत भाषा यांपैकीं कोण-कोणाची प्रकृति किंवा विकृति हा वाद न संपणारा आहे.

कोणतीहि भाषा घेतली कीं ढोबळपणें त्या भाषेचे दोन भाग पडतात. एक लिहिण्याची भाषा व दुसरी बोलण्याची भाषा. लिहिण्याची भाषा त्या भाषेंतील पंडि-तांनीं परिश्रमानें नीटनेटकी केलेली असते व या अर्थानें लिहिण्याची भाषा ही संस्कृत असते. बोलण्याच्या भाषेवर असा जाणून बुजून संस्कार केलेला नसतो. प्रत्येक बोली-मध्यें प्रचलित असलेल्या म्हणी, लोककथा व लोकगीतें यांच्याद्वारें त्या बोलीवर नक-ळत संस्कार होत असतो; पण तो लिहिण्याच्या भाषेसारखा डोळ्यांत भरण्यासारखा ठसठशीत नसतो.

भाषा वापरण्याचीं रसना व लेखणी हीं पुरातन काळापासूनचीं दोन साधनें आहेत. स्थळकाळाप्रमाणें रसना व लेखणी यांच्याद्वारें भाषा वापरण्याच्या पद्धतींत फरक पडत असतात. बारा कोसाला भाषा बदलते, या म्हणींत स्थलभेदानें भाषेंत फरक पडतो ही गोष्ट नमूद केली. ह्या म्हणींतील भाषा हा शब्द बोलण्याची भाषा ऊर्फ बोली या अर्थीं वापरण्यांत आला आहे. स्थलभेदानें लिहिण्याच्या भाषेंतहि बदल होतो; पण बोलीइतकी लिहिण्याच्या भाषेंत विविधता स्थलभेदानें उत्पन्न होत नाहीं. कालभेदानें बोली आणि लिहिण्याची भाषा यांच्या स्वरूपांत फरक पडतो.

स्थलकालभेदानें लिहिण्याच्या व बोलण्याच्या भाषेंत दिसून येणारे फरक हा भाषाशास्त्राचा महत्त्वाचा विषय आहे. ह्या अभ्यासानें ती ती भाषा बोलणाऱ्यांचा व लिहिणाऱ्यांचा धार्मिक आणि सामाजिक व राजकीय इतिहास जुळवितां येतो. मरा-ठीच्या प्राकृत भाषांचा अशा दृष्टीचा अभ्यास होण्यास पुष्कळ श्रम व काळ खर्चीं

पडला पाहिजे. अशा तऱ्हेच्या अभ्यासाचें दिग्दर्शन किंवा तो कसा करावा या संबंधाची चर्चा हा प्रस्तुत विषय नाहीं. कारण अशातऱ्हेच्या अभ्यासाकडे विद्वानांचें नुकतेंच विशेष तऱ्हेनें लक्ष्य जाऊं लागलें आहे. भारत—इतिहाससंशोधन मंडळाच्या अहवालांत व त्रैमासिकांत, डॉ. केतकर यांनीं 'विद्यासेवकांत' व श्री. चापेकर यांनीं महाराष्ट्रसाहित्यपत्रिकेंत लोकगीतें, लोककथा, म्हणी यांचा संग्रह करण्यास सुरवात केली आहे. पण एका निराळ्या दृष्टीनेंच मराठीच्या प्राकृत भाषा या विषयाला महत्व आलें आहे.

हें महत्त्व येण्यास देशाभिमानाची संकुचित कल्पना कारणीभूत झालीं आहे. आजकाल प्रत्येक जातीमध्यें स्वतःचें जातिवैशिष्ट्य राखून जातिवर्चस्व व्हावें अशी जशी प्रबळ इच्छा दिसून येते तशीच ती भाषेच्या बाबतींतहि दिसून येत आहे. भौगोलिक दृष्टीनें महाराष्ट्राचे ठळक असे कोंकण, घाटमाथा, देश, खानदेश, वऱ्हाड आणि नागपूर असे भाग पडतात. मराठी भाषेंत कोंकणी भाषेला स्वतंत्र अस्तित्व असावें असें कांहीं जणांना जसें वाटूं लागलें आहे; तसेंच आपल्या भाषेबद्दल वऱ्हाड-नागपूरच्या लोकांना वाटूं लागलें आहे. विदर्भामध्यें वऱ्हाड, नागपूर व मोंगलाईंतील मराठवाडा इतक्यांचा समावेश करण्यांत येतो. आज सर्वमान्य लिहिण्याची भाषा 'पुणेरी' या नांवानें ओळखली जाते. मराठी भाषेचें हें पुणेरी वळण मुंबईच्या संस्कारानें बदलूं लागलें आहे. पुणें—मुंबईच्या वळणाची लेखनपद्धति ही मराठी भाषेची लिहिण्याची भाषा अर्थात् शिष्टभाषा झाली आहे. हाच मान कोंकणी व विदर्भी भाषेला मिळावा अशी तत्प्रांतस्थांच्या मनांत आकांक्षा उत्पन्न झाली असून तशा तऱ्हेचा प्रयत्नहि सुरू झाला आहे.

ता. ७ व ८ सप्टेंबर रोजीं नागपूर येथें भरलेल्या विदर्भसंघाच्या संमेलनांत या विषयावर स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांनीं आपलीं मतें दिलीं असून या संबंधानें विदर्भ-संघानें दोन ठरावहि मंजूर केले आहेत. प्राकृतभाषाभिमानाची ही चळवळ योग्य आहे किंवा नाहीं, या चळवळीची योग्य दिशा कोणती व त्याप्रमाणें जिल्हासाहित्य-सभांना काय करतां येण्यासारखें आहे, या तीन प्रश्नांसंबंधानें कांहीं विचार प्रगट करणें इतकाच या लेखाचा विषय मर्यादित केला आहे.

मराठीच्या प्रत्येक प्राकृत भाषेनें आपला सवता सुभा निर्माण करण्याचा उद्योग केल्यानें 'नऊ पुरभय्ये आणि अकरा चुली' असली बजबजपुरी माजल्याशिवाय राहणार नाहीं. जातिवर्चस्वाच्या बुद्धीमुळें लहान लहान कोंडाळीं उत्पन्न होऊन समाज जसा विस्कळीत होतो तसा विस्कळीतपणा भाषेंत आल्याशिवाय राहणार नाहीं. रक्ताच्या अभिसरणाची क्रिया अप्रतिहत चालली म्हणजे आरोग्य टिकतें. रक्ताचें अभिसरण पुरें होऊन त्यापासून आरोग्य उत्पन्न होण्यास रक्ताला जो प्रवास करावा लागतो तेव्हां त्याला निरनिराळ्या नांवांच्या शिरांमधून आणि ठिकाणांमधून जावें लागतें. या ठिका-

णांच्या किंवा शिरांच्या अभिमानानें तें रक्त तेथेंच थबकून आम्ही येथल्या येथेंच रक्ता-भिसरणाची सर्व सृष्टि उत्पन्न करूं म्हणून अडून वसलें तर त्यामुळें तेथें सर्व सृष्टि तर उत्पन्न होत नाहींच; पण रक्ताभिसरण थांबल्यामुळें शरीर निष्प्राण होतें. तशीच प्राकृत भाषेच्या अभिमानानें मराठी भाषेची स्थिती झाल्यावांचून राहणार नाहीं.

ह्या वस्तुस्थितीच्या जाणीवेचे विचार विदर्भसंघाच्या संमेलनाच्या स्वागता-ध्यक्षांनीं व अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत मांडले असून ते संमेलनानें मान्यहि केले आहेत. विदर्भी भाषेच्या शिष्टपात्रतेच्या वादासंबंधानें स्वागताध्यक्ष घुलेशास्त्री म्हणतात:—

" आतां अलीकडे एक नवीन वाद उपस्थित झालेला आहे. त्याचा मात्र परिषदेंत आपल्यास अवश्य विचार करावा लागणार आहे. तो वाद म्हणजे विदर्भी मराठी भाषा शिष्टभाषा होण्यास पात्र आहे कीं नाहीं, या विषयासंबंधाचा होय. या वादां-तील वादी व प्रतिवादी हे दोघेहि चांगले विद्वान असल्याकारणानें ते आपल्या खंड-नमंडनात्मक लेखानें आठवड्यास 'महाराष्ट्र' पत्राचे रकानेच्या रकाने भरून काढीत आहेत. जिला सर्व लोक शिष्टभाषा म्हणून मान्य करतात ती शिष्टभाषा, हा अभि-प्राय लक्षांत घेऊन या प्रश्नाचें उत्तर दिल्यास वादाला जागाच राहत नाहीं. कारण ह्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे कोणतीहि भाषा शिष्ट भाषा होण्यास पात्र आहे असें दिसून येईल; व अर्थात्च विदर्भ-मराठी ही सर्वांनीं शिष्टभाषा म्हणून मान्य केल्यास तीहि शिष्टभाषा होईल हें सांगावयास नकोच. आता हें घडून येईल किंवा हें घडून येणें शक्य आहे किंवा नाहीं हा प्रश्न अगदीं निराळा आहे. पण तेवढ्यावरून तिच्यांत शिष्टभाषा होण्याची पात्रता नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं.

आतां विदर्भी मराठी आज सर्वमान्य होणें शक्य नाहीं असें जें मी म्हणतों त्याचें मुख्य कारण ती राजमान्य झालेली नाहीं हें होय. ती जर प्रथम राजमान्य झाली असती तर तीहि आज सर्वशिष्टसंमत झाली असती, यांत शंका नाहीं. पण तिचा संबंध राजकर्त्यांशीं फार उशिरा म्हणजे पुण्याकडील भाषा राजमान्य होऊन गेल्यानंतर आला. विदर्भ भाषा मागें पडली ती राजाश्रयाच्या अभावीं पडली, अपात्र म्हणून मागें पडली नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेऊन उभयपक्षी विद्वान आतां हा वाद मिटता घेतील अशी आशा आहे. माझ्या विदर्भबंधूंस माझी अशी सूचना आहे कीं, त्यांनीं प्रस्तुतच्या या शुष्क वादाच्या भरीस न पडतां आपल्या भाषेचें एक व्याकरण तयार करावें म्हणजे तिला स्थिरता येऊन तिचें वैशिष्ट्य कायम राहील. तसेंच नवीन ग्रंथ किंवा लेख लिहितांना विदर्भभाषेंतील योग्य शब्द उपयोगांत आणण्याचा अवश्य परिपाठ ठेवावा म्हणजे ते शब्द रूढ होऊन भाषेंत शब्दसमृद्धि करण्यास उपकारक होतील."

श्री. घुलेशास्त्री यांच्याप्रमाणेंच अध्यक्ष श्री. दादासाहेब खापर्डे यांनीं दिलेलें मतहि या वादाच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. श्री. दादासाहेब खापर्डे म्हणतात:—

मला अशी एक सूचना आली आहे कीं विदर्भी भाषेची पात्रता, वाक्प्रचार, म्हणी आणि शब्द, हे सर्वसामान्य भाषेच्या व्यवहारांत आणण्यासंबंधानें चार शब्द बोलावे. मराठी भाषा ही समुद्राप्रमाणें आहे. जसा हिंदी महासागर एकच आहे; त्याचा एक भाग बंगालजवळ आला त्याला 'बंगाली उपसागर' म्हणूं लागले; जो भाग खंबाइतजवळ आला त्याला 'खांबायतचें आखात' नांव पडलें; आणि पर्शियाजवळ गेला त्याला 'पर्शियन गल्फ' अशी संज्ञा मिळाली; वस्तुतः ह्या तिघांत कांहीं भिंती घालून वांटणी कोणी केली नाहीं; लोकांनीं आपल्या सोयीसाठीं हे विभाग कल्पिले आणि निरनिराळीं नांवें दिलीं आहेत. तद्वतच मराठी भाषा बोलणारांनीं मोठा प्रदेश भरतखंडांत व्यापिला, आणि त्याचे कालांतरानें निराळे विभाग पडले, आणि त्या त्या विभागांत बोलल्या जाणाऱ्या भाषांना 'पुणेरी' 'खानदेशी' 'वऱ्हाडी' नागपुरी' आणि 'मोंगलाईंतील' अशीं नांवें पडलीं; म्हणून त्या भाषा भिन्न आहेत असें मानतां येत नाहीं. विदर्भाची गोष्ट घेतली तर ती मराठीच असून तींत ज्ञानेश्वरमहाराज, नामदेव, तुकाराम, रामदास, दासोपंत, एकनाथमहाराज, शिवदिनकेसरी, देवनाथ, दयाळनाथ, वगैरे पुष्कळ कवी होऊन गेले. शिवाय तिला संस्कृताचें पाठबळ आहे. तेव्हां तिला अपाल म्हणण्यास कोण धजावूं शकतो ? तिच्यांतील शब्द, म्हणी आणि वाक्प्रचार उपयोगांत आणणें; आणि सामान्य मराठी वाक्यांत मिसळून देणें, हें कवि, नाटककार, लेखक, वर्तमानपत्रकार आणि वक्ते ह्यांचें काम आहे. तसेंच मुत्सद्दी आणि राजकार्य करणारे ह्या कार्याला मदत करूं शकतात. त्यांची संख्या आपणांत जशी वाढेल आणि सर्वमान्य होईल तशी विदर्भी भाषा सर्वतोमुखीं होईल.

स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांनीं केलेलें मार्गदर्शन पत्करून संमेलनानें पुढीलप्रमाणें दोन ठराव मंजूर केले आहेत.

( ८ ) मराठी वाङ्मयाची व ग्रंथांची एक भाषा असावी; त्याकरितां सध्यां रूढ असलेली भाषाच मान्य करण्यांत यावी. निरनिराळ्या पोटभाषांत असलेले शिष्टसंमत शब्द व वाक्प्रचार उपयोगांत आणणें हे लेखकाच्या अभिरुचीवर असावें. ( ९ ) सर्वमान्य व शिष्टसंमत असलेले विदर्भीय शब्द व वाक्प्रचार साहित्यभक्तांनीं लेखनांत व भाषणांत उपयोगांत आणणें हें मराठी भाषेच्या समृद्धीच्या दृष्टीनें इष्ट आहे. म्हणून साहित्यभक्तांनीं ते ग्रांथिक भाषेंत रूढ करावे. सर्वसामान्य महत्त्वाचा ग्रंथ विशिष्ट पोटभाषेंत लिहणें घातुक आहे असें या परिषदेचें मत आहे.

कोणतीहि भाषा सर्वमान्य होण्यास ती एक राज्यकर्त्यांची तरी असावी लागते किंवा ती धर्मसंस्थापकांनीं उपयोगांत आणावी लागते. बुद्धानें आपला धर्म त्या वेळच्या प्राकृत भाषेंत प्रसृत केला म्हणून 'पाली' ही सर्वमान्य भाषा झाली. मराठी ही सर्वमान्य भाषा होण्यास देवगिरीच्या यादवांच्या राज्याप्रमाणेंच ज्ञानेश्वरादि संतांची मदत झाली आहे असें दिसून येतें. आज धर्मप्रसारापेक्षांहि राजकीय मतप्रचाराला लोकशाहीच्या

तत्त्वामुळें महत्त्व प्राप्त झालें आहे. धर्माचा प्रचार हा मुख्यतः लोकांचीं मनें वळवून करावयाचा असल्यामुळें धर्मसंस्थापकांना प्राकृत भाषांचाच आश्रय करावा लागला आहे असें दिसून येतें, तशी व तितकी जरूरी राज्यकर्त्यांना भासत नाहीं. राज्यकर्ते येतात व लोक त्यांची भाषा शिकूं लागतात. पण हा जुना जमाना आतां पालटत असून राज्यांच्या उलाढाली या एकव्यादुकल्याच्या कर्तृत्वापेक्षां लोकांच्या इच्छाबळावर घडून येत असल्यामुळें राज्ययंत्रामार्फत लोकांची सुधारणा करूं इच्छिणारांना किंवा ती करण्यासाठीं राज्ययंत्राचा तावा मिळवूं इच्छिणारांना लोकांच्याकडे धांव घ्यावी लागत आहे. त्यामुळें स्वाभाविकपणेंच मराठी व तिच्या प्राकृत भाषा यांचा मधुरमिलाफ होण्यास महाराष्ट्रांत सुरवात होऊं लागली आहे.

हा मधुरमिलाफ घडवून आणण्याची रीत विदर्भी भाषेच्या बाबतींत जी श्री. दादासाहेब खापर्डे यांनीं सांगितली आहे तिचा अवलंब महाराष्ट्रांत इतर प्राकृत भाषांच्या बाबतींतहि थोडाफार होऊं लागला आहे. प्राकृत भाषांतील शब्द, म्हणी आणि वाक्प्रचार उपयोगांत आणणें आणि सामान्य मराठी वाक्यांत मिसळून देणें हें कवि, नाटककार, लेखक, वर्तमानपत्रकार आणि वक्ते ह्यांचें काम आहे. तसेंच मुत्सद्दी आणि राजकार्य करणारे ह्या कार्याला मदत करूं शकतात. त्यांची संख्या आपणांत जशी वाढेल तशा प्राकृत भाषा सर्वतोमुखीं होतील. अशा रीतीनें सुरू असलेल्या प्रयत्नांचें दिग्दर्शन कांहीं उतारे देऊन करतां येण्यासारखें आहे.

महाराष्ट्रांत सध्या पुणेरी मराठी ही संस्कृत आणि बाकीच्या म्हणजे गोमंतकी, कोंकणी, विदर्भी, कुणबाऊ, बायकांच्या वापरांतली या प्राकृत म्हणजे बिनसंस्काराच्या भाषा मानण्यांत येतात. कुणबाऊ भाषेंतलें जुनें उत्कृष्ट वाङ्मय म्हणजे पोवाडे व त्याच्या खालोखाल लावण्या. पोवाडयाच्या कुणबाऊ भाषेचा आश्रय करून शाहीर पां. द. खाडीलकर हे आपले पोवाडे रचून ते म्हणत असल्यामुळें त्या भाषेचा प्रचार हल्लीं महाराष्ट्रभर होऊं लागला आहे. बायकापुरुषांच्या बोलण्यांतील जिला घरगुती प्राकृत भाषा म्हणतां येईल तिचा प्रचार कादंबरीच्या व नेपथ्यपाठादि लेखनांच्या द्वारें होऊं लागला आहे. कुणबाऊ भाषेंतील शब्द वापरून कविता करण्याकडे बऱ्याच कवींचा कल होऊं लागला आहे. घरगुती प्राकृतांत नागपूरचे उपाध्ये कवि यांनीं 'चालचलाऊ भगवद्गीता' रचली असून तिचा एक अध्याय 'विद्यासेवक' मासिकाच्या पांचव्या वर्षाच्या तिसऱ्या अंकांत डॉ. केतकर यांनीं प्रसिद्ध केला आहे. त्याबद्दल 'गीता आणि अनागर भाषा' म्हणून डॉ. केतकर यांनीं केलेल्या खुलाशांत ते म्हणतात, "रा. रा जयकृष्ण केशव उपाध्ये यांनीं 'चालचलाऊ भगवद्गीता" म्हणून जें काव्य लिहिलें आहे तें प्रस्तुत अंकांत छापलें आहे. रा. उपाध्ये यांचा तें काव्य लिहितांना नागपुरी भाषा व बोलण्याची पद्धतीहि मांडण्याचा हेतु आहे. त्यांस गीतेविषयीं अनादर मुळींच नाहीं. तें काव्य अनादरामुळें उत्पन्न झालें नसून स्वभाषाप्रे-

मामुळें उत्पन्न झालें आहे. जातिविशिष्ट आणि प्रांतिक भाषेचा अभिमान धरून आपलें आवडतें काव्य आपल्या आवडत्या भाषेंत पुष्कळांकडून मांडण्याचा प्रयत्न होतो. उदाहरणार्थ, हरिलाल भट, दक्षिणामूर्ति विद्यार्थीभवन भावनगर, यांनीं गुजराती मेढपाळांच्या भाषेंत भगवद्गीता मांडण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांत कृष्णाला करहणिया आणि अर्जुनाला अर्जुणिया अशीं नांवें देऊन नागर गुजराती मंडळींत हास्य उत्पन्न करणारें पण काठेवाडी अनागरांमध्यें प्रेमभाव उत्पन्न करणारें संभाषण एका गीतांत दिलें आहे. इतर भाषांत देखील असे प्रकार आढळतीलच."

कवींप्रमाणें नाटककारांनीं प्राकृत भाषेचा उपयोग आपल्या नाटकांतील दुय्यम पात्रांच्या तोंडीं घालण्यासाठीं केला आहे. याचें एक उदाहरण म्हणजे श्री. कदम यांचें 'ललाटलेख' नाटक. हें नाटक विशेषतः त्यांतील तळेगांवचे ढमढेरे व मालवणची त्यांची बायको पिटां यांचे प्रवेश रंगभूमीवर चांगले रंगतात. त्यांपैकीं नमुन्याकरतां तिसऱ्या अंकांतील पांचव्या प्रवेशांतील त्यांचा संवाद देतों. या प्रवेशांत पांचव्या सहाव्या लग्नासाठीं अधीर झालेल्या ढमढेऱ्याच्या गळ्यांत मालवणसुंदरी पिटां पडल्यानंतर तो तिला घेऊन जात असतांनाचा हा संवाद आहे.

ढ.—सुंदर, तुझें माहेरचें नांव काय ?

पि.—कोनचां ? माजा ? माजा नांव पिटां.

ढ.—तुझ्या बापाचें नांव काय ?

पि.—कोनच्या ? माज्या ? माज्या बापासचें नांव येसो. आतां जितो नाय तो मेलो. नाना हुनत त्यांकां.

ढ.—काय म्हणालीस तुझ्या बापाचें नांव ?

पि.—येसो हून सांगकय मां. येसो, येसो, येसो.

नंतर ढ.—हात धरून चाल म्हणून सांगितलं ना ?

पि.—हात धरून ? हात धरून काय हुनान !

मिया काय उचलां ! काय पळवून लावलेला वोचक्या काय. हात धरून इलेला पळपुटा असे हून हात धरून चलान. चांगली लगीन गांठ बांधान इला असे.

"कानडीनें केला मराठी भ्रतार' याच्या उलट पुणेरी नागऱ्याची मालवणी सुंदरीशी गांठ पडल्यामुळें तो बुचकळ्यांत पडतो. लगीन गांठ एवढा शब्द त्याला समजला तेवढा ध्यानांत. तो आपल्या धोतराची व तिच्या शेल्याची गांठ मारतो. इतक्यांत वर्तमानपत्रें विकणारा पोऱ्या धांवत येऊन यांच्या लगीनगांठीला अडखळतो व तिघेहि रस्त्यावर भूमातेला वंदन करतात असा या प्रवेशाचा शेवट आहे.

कवि आणि नाटककारांप्रमाणेंच कांहीं वर्तमानपत्रकारांनीं नाट्यछटांच्या द्वारें घरगुती प्राकृताचा प्रचार जसा सुरू केला आहे तसाच प्रचलित विषय बोलींत मांड-

ण्याचा तुरळक प्रयत्न केलेला आढळतो. याचें प्रसिद्ध उदाहरण म्हणजे अच्युतराव कोल्हटकरांनीं लिहिलेलीं वत्सलावहिनींचीं पत्रें होत. अशा प्रयत्नापैकीं शारदा बिला-संबंधानें 'परळ-समाचारांत' नुकताच प्रयत्न करण्यांत आला आहे.

मुत्सद्दी व राजकार्य करणाऱ्यांपैकीं सरदार वल्लभभाई पटेल यांनीं प्राकृत भाषेचा फारच उत्तम रीतीनें बारडोलीच्या चळवळींत उपयोग करून घेतल्याचें दिसून येतें. त्याप्रमाणें मराठींत अजून प्रयत्न व्हावयाचा आहे.

श्री. दादासाहेब खापर्डे यांनीं सांगितलेल्या रीतीप्रमाणें प्राकृत भाषा मराठींत मिसळून टाकण्याकरतां चाललेल्या प्रयत्नांचें दिग्दर्शन वर केलेंच आहे. याखेरीज आणखी एका उपायाची सूचना करावयाची आहे. मराठी भाषेच्या अभ्यासांत जसे जुन्या वाङ्मयाचे उतारे ठेवण्यांत येतात तसेच लोकगीतें व लोककथा यांतील उत्कृष्ट वेंचे मराठीच्या अभ्यासक्रमांत ठेवण्यांत आले तर प्राकृत भाषा श्री. दादासाहेब खापर्डे यांच्या पद्धतीनें मराठींत मिसळून जाण्यास चांगलीच मदत झाल्याशिवाय राहणार नाहीं. तेव्हां मराठीच्या प्राकृत भाषेंतील निवडक वेंचे मराठी क्रमिक पुस्तकांतून घाल-ण्याबद्दल व एम्. ए. परीक्षेच्या परीक्षेसाठीं मराठीच्या प्राकृत भाषांतील लोकगीतें व लोककथा ठेवण्याबद्दल शिक्षणखात्यांना, संस्थांना व विश्वविद्यालयांना विनंति कर-ण्यांत यावी.

ठिकठिकाणच्या साहित्यसभांनीं सध्यां लोकगीतांचा व लोककथांचा संग्रह करण्याच्या उपक्रमास आपल्या परीनें हात भार लावला पाहिजे व या संग्रहाचा यथा-शक्य अभ्यास करण्यासहि सुरवात केली पाहिजे. साष्टी तालुक्यांत एकंदर सुमारें दीड लाख लोक आहेत. त्यांपैकीं मुसलमान १४ हजार व पुढारलेले हिंदू १८ हजार मिळून ३२ हजार लोक सोडले तर उरलेल्या लोकसंख्येंत बावीस हजार ख्रिश्चन व तितकेच कोळी यांची बोलण्याची भाषा प्राकृत मराठी आहे. अगदीं मागासलेले वारली, कातकरी, ठाकूर यांची शिरगणति सुमारें चौपन्न हजार भरते. कोळी व ख्रिश्चन यांचीं व वारली वगैरे लोकांची लोकगीतें व लोककथा यांचा संग्रह करून त्यांचा अभ्यास करतां येण्याजोगा आहे. यामुळें त्यांच्या जीवनांत वाङ्मयाच्या द्वारें बदल घड-वून आणण्याचें कार्य सुकर होणार आहे. जीवनांत इष्ट असा बदल घडवून आणणें हेंच वाङ्मयाचें खरें कार्य असल्यामुळें साष्टी तालुक्यांत प्राकृत भाषांच्या अभ्यासानेंहि मराठी भाषेची अभिवृद्धि होण्यास फार मदत होण्यासारखी आहे.

———

# मराठी शुद्धिभ्रमचर्चा

(लेखकः--विष्णु हरी निजसुरे)

'भङ्क्तुं प्रभुर्व्याकरणस्य दर्पं पदप्रयोगाध्वनि लोक एषः ।
शशो यदस्यास्ति शशी ततोयमेवं मृगोस्यास्ति मृगीति नोक्तः " ॥ नैषध

[अर्थः-- चन्द्रावर दिसणारा डाग हा ससा आहे किंवा हरिण आहे अशी कल्पना आहे. त्या कल्पनेवरून ज्याला शश म्हणजे ससा आहे तो शशी हें नांव लोक चंद्राला देतात परंतु ज्याला मृग आहे तो मृगी असें नांव मात्र ते चन्द्राला देत नाहींत. तेव्हां शब्दप्रयोग करण्याच्या मार्गांत माझेंच साम्राज्य आहे हा व्याकरणशास्त्राचा गर्व उतरण्यास लोक हे समर्थ आहेत.]

अवास्तव रीतीनें शब्दांचीं रूपान्तरें होतात त्यांस आळा घालण्यासाठीं रा. गोविंद कृष्ण मोडक यांनीं अशा रूपान्तरांची चर्चा सुरू केली आहे. ही चर्चा फारच उपयुक्त आहे म्हणून अवश्यक आहे. प्रस्तुत लेखांत रा. मोडकांनीं कांहीं रूपांसंबंधीं घेतलेले आक्षेप बरोबर आहेत कीं कसें याचें परीक्षण करण्याचें योजिलें आहे.

प्रथम आपण अंधकार–अंधःकार, धिकार-धिःकार, हाहाकार हाहाःकार हीं रूपें विचारासाठीं घेऊं. येथें मूळ विसर्गरहित रूपांचीं सविसर्ग विकृतरूपें झालीं आहेत. तीं अधःपात वगैरे शब्दांच्या साम्याभासानें झालीं आहेत असें रा. मोडक म्हणतात. परंतु पहिल्या व तिसऱ्या शब्दांतील विसर्ग हा जोर आणण्याकरितां आला असावा. ज्याप्रमाणें योद्धा या अर्थाचा एकटकारयुक्त भट शब्द पुळपुळीत वाटतो, त्याप्रमाणेंच आपत्तीनें झालेला गोंधळ दाखविण्यास विसर्गरहित हाहाकार शब्द पुळपुळीत वाटतो. अंधकार शब्दांतहि दाटपणा दाखविण्यास विसर्गाचेंच साहाय्य घेतलेलें दिसतें. तीनहि शब्दांत कवर्णापूर्वी उच्चारिला जाणारा अर्धविसर्गसदृश जिव्हामूलीय येथें पूर्णविसर्गरूपानें पुनर्जन्म पावला हेंहि स्वरोच्चारशास्त्रांतील कारण सांगतां येईल.

चरित म्हणजे जन्मापासून मरणापर्यंतचा इतिहास. त्याऐवजीं चरित्र म्हणजे चरिताची सरणी हा शब्द चुकीनें प्रचारांत आला आहे सबब तो त्याज्य आहे असें रा. मोडकांचें म्हणणें, परंतु तें चिन्त्य आहे. व्युत्पत्तीप्रमाणें चरित्र शब्दाचा अर्थ चरिताची सरणी असा असला तथापि कोशकार चरित्र याचाहि अर्थ आयुष्याचा वृत्तान्त असा देतात. (आपटे यांचा सं. इं. कोश पहा. ) अमरसिंहहि ' वृत्तं पद्ये चरित्रेच ' इत्यादि श्लोकार्धांत, वृत्त म्हणचे घडलेलें, याला चरित्र असा एक पर्याय देतो. शिवाय शुद्धिभ्रमाच्या यादींतील सर्व शब्दांत चरित्र शब्द आतां इतका मान्य व मूर्धाभिषिक्त झाला आहे कीं वाङ्मयांतील एका अत्यंत स्पृहणीय शाखेचें नामाभिधान या शब्दानें दर्शविलें जातें. तेव्हां त्यास पदभ्रष्ट करणें अब्रह्मण्यच होईल. शिवाय शास्त्रीय दृष्टयाहि त्याचें शुद्धीकरण झालें आहे हें सहज दाखवितां येईल. चरित्र म्हणजे आयुष्याची सरणी हें साधन म्हणजे करण म्हणजे कारण व चरित हें कार्य म्हणून कार्य व कारण यांच्या अभेदसंबंधानें दोहोंचें तादात्म्य मानून चरित्र याचा लक्षणेनें चरित्र हा अर्थ अगदीं बरोबर आहे. तेव्हां प्रस्तुत शब्द त्याज्य नव्हे.

पुंलिंगी हा शब्द एक लकारयुक्त लिहून भागत असतां तो दोन लकारयुक्त लिहिणें अवश्यक नाहीं हें आम्हांस मान्य, पण दोन लकारात्मक लिहिणारे तसें कां लिहितात याची उपपत्ति मात्र चांगली लावतां येते. अनुस्वारापुढें य्, व्, र्, किंवा ल् आले असतां त्याचे विकल्पानें अनुनासिक य्, व्, र्,



अनुक्रमणिका

किंवा ल् अनुक्रमें होतात. म्हणजे पुम्+लिंग=पुंलिंग किंवा पुँल्लिंग. पण य्, व्, र्, किंवा ल् यांच्या-पूर्वी अनुस्वार व अनुनासिक यांचा भेद स्पष्ट प्रतीत होत नाहीं; म्हणून पुँल्लिंग या ऐवजीं पुंल्लिंग असें मराठी लेखक लिहितात. त्यांस पाणिनींचें 'वा पदान्तस्य' हें सूत्र माहित नसेलच. पण यावरून संस्कृतांतील व्याकरणकार व मराठी बोलणारे हे एकमेकांचें समर्थन करणारे कसे झाले आहेत हें सुंदर रीतीनें सिद्ध होतें.

लाजहोम ( लाजाहोम हेंहि रूप प्रचारांत आहे ) याचें जें लज्जाहोम रूप झालें त्याचें कारण केवळ आचरटपणापेक्षां विनोदाची इच्छा हेंच दिसतें. विवाह लागल्यावर लाजाहोमाच्या वेळीं वधूवरें शेजारीं शेजारीं बसतात व त्यावेळीं परस्परांचा हस्तस्पर्श होणें व प्रदक्षिणेचे वेळीं वधूस कडेवर घेऊन मिरवण्याबद्दल वरास चाललेला आग्रह यांवरून लाजेचा होम करणें हा अर्थ घेऊन हा शब्दप्रयोग होतो. हा आचरटपणा कीं काय हें शब्दशास्त्रापेक्षां रसिकपणानेंच ठरविलेलें बरें. अर्थात् विवाहविधींचें गंभीरपणानें वर्णन करतांना लज्जाहोम शब्द त्याज्य ठरेल. विनोदप्रसंगीं तो ग्राह्य ठरेल.

आतां निद्रिस्त, द्रुष्ट व संपुष्ट यांचा विचार करूं. निद्रित शब्दांतील शेवटच्या दोन अक्षरांचा उच्चार तोकडा वाटत असल्यामुळें तोंडभर उच्चार होण्याकरितां एक व्यंजन ज्यास्त घेतलें, तें कोणतें? तर द्रि अक्षरांतील मूर्धास्थानांतील रेफाचा उच्चार झाल्यावर दन्त्यस्थानांतील तकारावर जाण्याच्या अगोदर दांतांस किंचित् स्पर्श करणारा असा दन्त्यसकार होय. संपुट व दुष्ट शब्दांतहि प् व उ आणि द् व उ या अनुक्रमें ओष्ठ्य व दन्त्य वर्णोच्चारांवरून मुखांत मागें स्थान असलेल्या ट् व ष या मूर्धन्योच्चारांवर जातांना अनुक्रमें ट व ष याहून कमी आघाताच्या मूर्धन्य रचा व षचा समावेश केला गेला आहे. द्रुष्ट शब्दास मूर्धन्य रकारानंतरहि उ या ओष्ठ्याचा ओठ उघडे राहिल्यामुळें उच्चार होऊं शकतो. तात्पर्य असे उच्चार होण्यांत शब्दशास्त्राचें अज्ञान असो अगर नसो, जे अपभ्रंश झाले आहेत ते ज्या स्वाभाविक उच्चार करण्याच्या प्रवृत्तीमुळें स्वरोच्चारशास्त्र बनविणें शक्य झालें त्या प्रवृत्तीस धरून आहेत तेव्हां त्यांस नांवें ठेवणें योग्य कीं काय याचा सुज्ञांनीं विचार करावा. शिवाय संपुष्ट शब्द आतां एका वाक्प्रचारांतहि गोंवला गेला आहे, त्याची हकालपट्टी कशी करावयाची?

शतकृत्य हा शब्द शतक्रतूपासून अवयवार्थापासून शब्द काढण्याच्या कृतीनें झाला आहे असें म्हणण्यापेक्षां क्रतु याचा उच्चार चुकीनें कृत्य होऊं लागला हेंच बरें दिसतें. मशहूरचें महशूर हेंहि रूप अवयवार्थनिष्कर्ष व कल्पनासंवाद या कारणांनीं न होतां केवळ 'वर्णविपर्यय' म्हणजे अक्षरानुक्रमाची उलटापालट हा जो अपभ्रंशाचा व्यापक नियम त्यानें बनलें आहे.

रकाराची रेफ ही पूर्वापार संज्ञा मान्य पण रफार ही अलीकडील संज्ञा अमान्य हें रा. मोडकांचें म्हणणें सोईसाठीं कबूल. पण उपपत्तीनें व उत्पत्तीनें दोघांची जातकुळी एकच ठरते; कशी ती पहा. ककार, चकार वगैरे वर्णांच्या संज्ञा पाणिनीनें नव्हे, तर वार्तिककार कात्यायन यानें 'वर्णात्कारः' या वार्तिकानें सांगितल्या. ऐतिहासिक दृष्टीनें याचा अर्थ असा कीं अकार गकार अशा संज्ञा पाणिनी व कात्यायन यांच्या दरम्यानच्या काळांत प्रचारांत आल्या; पण रकाराच्या ऐवजीं रफार लिहिणाऱ्या हल्लींच्या ग्रंथकारांप्रमाणें तेव्हांहि रकार न म्हणतां किंवा म्हणूनहि शिवाय रेफ म्हणणारे लोक होते असें दिसतें. म्हणून कात्यायनानें 'वर्णात्कारः' या वार्तिकानंतर 'रादिफः' असें वार्तिक रचलें आहे. पुढील टीकाकारांनीं 'रकार' व रेफ या दोन्ही संज्ञा 'वासरूपविधीनें' ग्राह्य ठरविल्या. ( तत्त्वबोधिनी पहा ). ( रा. मोडकांच्या लिहिण्यावरून संस्कृतांत रेफ ही एकच रकाराची संज्ञा होती असा समज होतो.) तात्पर्य, इतर वर्णांना मात्र 'कार' पण रला मात्र इफ असें कां? याचा अर्थ इतकाच कीं रेफ ही संज्ञा मात्र दांडगाईनें झाली. रफार या संज्ञेला कांहीं तरी कार्यकारणसंबंध तरी सांगता येतो. तो असा कीं रेफ यांतील फ व रकार यांतील आर यांच्या संमिश्रणानें रफार बनला. तात्पर्य, रेफापेक्षां रफारच ग्राह्य

ठरतो. पण रेफ हा वडील म्हणून मान्य पण रफार 'अलीकडचा पोर' म्हणून अमान्य. घरांतील म्हातारा जन्मभर संध्या करित नसला तरी तो बाडगा नव्हे. पण नवीन मुंज झालेल्यानें मात्र संध्या केली नाहीं म्हणजे तो बाडगा असा हा न्याय झाला. तात्पर्य रेफ, रकार व रफार तिन्ही संज्ञा मान्य करण्यास हरकत नाहीं. लाघवन्यायानें रेफ ही सोयीची.

नादसाम्यामुळें झालेल्या चुकीच्या अपभ्रंशाचें उदाहरण म्हणून 'हस्तामलकाचें' " हातचा मळ " हें रूप रा. मोडक देतात. पण एकतर हस्तामलकापेक्षां 'करतलामलक'च संस्कृतांत ज्यास्त प्रचारांत असावा. आपटे यांच्या संस्कृत कोशांत हस्तामलकाच्या खालीं 'करतलामलक फलवदखिलं जगदालोक्यतां' हें अवतरण दिलें व आहे करतलामलक या शब्दाखालींहि अर्थात् तेंच अवतरण दिलें आहे. मराठींतहि 'जैसा करतळींचा आंवळा' हीच म्हण ज्यास्त प्रसिद्ध आहे. तेव्हां हातचा मळ हें हस्तामलकाचेंच अपभ्रष्ट रूप मानण्यास मन घेत नाहीं. शिवाय 'हस्तामलक' यांत ज्ञानसौलभ्याचा अर्थ आहे. तेव्हां 'हातचा मळ' यांत क्रियासौलभ्याचा अर्थ दिसतो. तेव्हां हातचा मळ हा वाक्प्रचार निवळ मराठींतूनच उत्पन्न झाला असावा व तसें होणें अगदीं शक्य आहे ('तळहातावरचा फोड' याप्रमाणें). तथापि वादासाठीं क्षणभर तो संस्कृताचाच अपभ्रंश आहे असें मानलें तरी इतका रुळलेला वाक्प्रचार त्याच्या मूळ संस्कृत रूपांत सुरू करणें म्हणजे तो प्रकार केवळ पंडितंमन्येतचाच ( Pedantic ) दिसेल.

सविभक्तिक शब्दांस संस्कृतांत सुबन्त ही संज्ञा आहे. ती तशीच मराठींत उपयोजिणारांना रा. मोडकांनीं मूर्ख ठरविण्यांत अगदीं घाई केली आहे. सुप्प्रत्याहार मराठींत नसला तरी शब्दांचा अर्थ- संकोच होणें व अर्थविस्तार होणें या क्रियांनीं विशेषार्थक शब्द सामान्यार्थानें व सामान्यार्थक शब्द विशेष अर्थानें वापरण्याचा जो प्रघात सररास आढळतो त्याचेंच उदाहरण आहे. प्रथमतः प्रत्याहारानें सुप् म्हणजे संस्कृतांतील विभक्तिप्रत्यय, म्हणजे कारकसंबंध दाखविणारा अक्षरसमूह, हा विशिष्ट अर्थ संस्कृतांत होता. त्याचाच विस्तार करून कोणत्याहि भाषेंतील कारकसंबंध दाखविणारा अक्षरसमूह हा अर्थ मराठी लेखकांनीं करून सुबन्त ही संज्ञा मराठींत सुरू केली. हीच गोष्ट निराळ्या रीतीनें सांगावयाची म्हणजे असें कीं संस्कृत 'सुप्' व 'मराठींतील विभक्तिप्रत्यय' यांमध्यें 'कारक- संबंध दाखविणें' हा धर्म समान असल्यामुळें पहिल्याचा दुसऱ्याच्या अर्थी लक्षणेनें प्रयोग केला असतां तो अगदीं शास्त्रशुद्ध आहे. लक्षणा ही तरी सोईसाठींच करावयाची असते; फक्त येथें भिन्नभाषांतील शब्दांमध्यें हा व्यापार झाला आहे येवढेंच. पण त्या भाषांचें नातेंच निकटचें असल्यामुळें त्यांत गैर कांहींच नाहीं. मराठीला मात्र एका ऱ्हस्व संज्ञेचा लाभ झाला. शिवाय इंग्रजीशीं जुळतें घेण्याकरितां संस्कृतांतील क्रियापदाच्या पुरुषांच्या अनुक्रमांची फिरवाफिरव जर सोयीसाठीं मान्य करावयाची, तसेंच तिळांचा स्नेह म्हणजे तेल असें असतां एरंड, बदाम, आंवळे इत्यादिकांच्या स्नेहालासुद्धां जर तेल म्हटलेलें चालतें तर संस्कृतांतील सविभक्तिक शब्दांची सुबन्त ही संज्ञा मराठींतील तत्सदृश शब्दांना लावण्यांत गैर तें काय ? लक्षणाव्यापाराचा अधिकारच इतका विस्तृत आहे.

प्रामादिक वाक्प्रचार — या मथळ्याखालीं रा. मोडकांनीं कमिटीवर नेमणें, व्यायाम घेणें, काळजी घेणें, कारखाना मोठ्या प्रमाणावर काढणें, हे नवीन रूढ झालेले वाक्प्रचार अशुद्ध म्हणून टाकिले पाहिजेत असा निर्णय दिला आहे. व त्यास कारण म्हणून मराठी भाषासरणिभंग व संदेहसंभव या दोन दोषांची प्राप्ति हें दिलें आहे. पण त्यांनीं केलेली चिकित्सा अपुरी पडते. अगोदर हे वाक्प्रचार इंग्रजी- अनुकरणानें उत्पन्न झाले आहेत ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. ते इंग्रजीच्या अनुकरणानें आले येवढ्यावरच ते मान्य करावेत असें आम्ही म्हणत नाहीं. शब्दांचा प्रयोग ठरतांना जो मानसिक व्यापार होतो त्याला अनुसरून जर इंग्रजींत ते योग्य ठरतील तर इंग्रजांचा मानसिक व्यापार व मराठ्यांचा

मानसिक व्यापार हे भिन्न नसल्यामुळें मराठींतहि ते मान्य करण्यास हरकत नाहीं. हीच गोष्ट शास्त्रीय भाषेंत बोलावयाची म्हणजे त्याचें प्रवृत्तिनिमित्त जर योग्य असेल तर कोणत्याहि भाषेंत ते योग्यच ठरतील.

आतां आपण 'कमिटीवर नेमणें' ह्याचा विचार करूं. सभासद व मंडळ यांमध्यें व्याप्य-व्यापक-संबंध असल्यामुळें येथें वर हें अव्यय न योजतां आंत हें योजावें असें म्हणणें आहे, पण इंग्रजींत to appoint to a committee, to work on a committee; असे प्रयोग होतात पण include क्रियापद असतां include in a committee असा प्रयोग होतो. व्याप्य-व्यापक-संबंध दोन्ही ठिकाणीं जर सारखाच तर इंग्रजींत दोनहि वाक्प्रचारांत in याचा प्रयोग कां नाहीं ? इंग्रजी लोकांची ती लहर असें म्हणून वेळ मारून नेतां येईल, परंतु 'स्थितस्य गतिः चिंतनीया' या न्यायानें याची उपपत्ति लावतां येते कीं नाहीं तें पाहूं. सभासदांचें मंडळ म्हटल्यावर मण्डळ शब्दानें मनांत जी कल्पना येते तीमध्यें त्या मंडळाच्या विशिष्ट अधिकाराचा बोध होतो, व जो कोणी त्या मंडळाचा सभासद होतो तो त्या अधिकाराच्या अधिष्ठानावर किंवा आधारावर मंडळावर सोपविलेलें काम करण्यास पात्र होतो. तेव्हां हा अधिष्ठान-अधिष्ठेय-संबंध लक्षांत घेऊन येथें on किंवा मराठींत वर या अव्ययाचा प्रयोग केला गेला आहे. जसें पैशाच्या जोरावर किंवा अमक्याच्या जिवावर चैन. Include याचा उपयोग करतांना हा अधिष्ठान-अधिष्ठेय-संबंध विशेष लक्षांत न घेतां फक्त समावेश्य-समावेशक येवढ्यावरच लक्ष्य ठेवलें गेलें आहे म्हणून तेथें in यानें काम केलें.

इंग्रजींत to take exercise व कित्येक वेळां to do exercise असेंहि म्हणतात. मराठींतहि व्यायाम घेणें व व्यायाम करणें असें म्हणण्यास हरकत नाहीं. कां ? धात्वर्थासंबंधानें 'फल-व्यापारयोः कर्ता' असें संस्कृत व्याकरणकार सांगतात. उदाहरणार्थ 'जेवतांना बोलूं नये' ह्या वाक्यांत जेवणें ही क्रियाच केवळ उद्दिष्ट आहे, परंतु हे वाक्य घ्या, 'काय करावें, बाई, चार दिवसांपासून पोर जेवत नाहीं,' येथें जेवणें हा केवळ व्यापारच उद्दिष्ट नसून त्याचें फळ जी क्षुधाशान्ति ही उद्दिष्ट आहे. त्याप्रमाणेंच to do exercise किंवा व्यायाम करणें व to take exercise किंवा व्यायाम घेणें या जोड्यामध्यें करणें किंवा do यांपासून व्यापार झटकन प्रतीत होतो तर take किंवा घेणें यांपासून व्यायामक्रियेचें फळ जें आरोग्य त्याची प्रतीति झटकन होते व व्यापाराची प्रतीति तिच्यांत अन्तर्भावित असते. अर्थात् फलाच्या दृष्टीनें व्यायाम घेणें हा प्रयोग सयुक्तिक ठरतो.

काळजी करणें याचे अर्थ दोन (१) मानसिक अस्वस्थता असणें व (२) अपायावर उपाय-योजनेची तजवीज करणें. तेव्हां हे दोन भिन्न अर्थ व्यक्त करण्यासाठीं जर दोन भिन्न शब्द असतील तर काय बिघडलें ? काळजी करणें यानें निवळ मनाचें अस्वास्थ्य दाखवावें व उपायांची तजवीज करणें या अर्थी काळजी घेणें हा शब्दप्रयोग करावा. तात्पर्य to take care या इंग्रजी प्रयोगाच्या भाषान्तरानें भाषासरणिभंग घडला असें न मानतां एक वाक्प्रचार अधिक मिळून भाषेच्या अर्थ व्यक्त करण्याच्या संपत्तींत भर पडली असेंच मानणें योग्य व इष्ट आहे.

रा. मोडकांनीं अशुद्ध ठरविलेल्या बहुतेक शब्दांस वरील विवेचनानें आम्हीं शुद्ध ठरविलें आहे व हें ठरवितांना शास्त्रीय उपपत्ति देण्याचा प्रयत्न केला आहे. तर मग भाषेंत अशुद्ध प्रयोगच नाहींत कीं काय ? त्यास उत्तर असें कीं विकृत प्रयोग नवीन आहेत तोंपर्यंत तें अशुद्ध पण ते बोलण्यांत ठाम होऊन लेखनद्वारा मान्य झाले म्हणजे त्यांचें अशुद्धपण संपलें. या बाबतींत करतां येण्यासारखी गोष्ट म्हणजे ही विकृति जितकी अल्प व हळुहळू होईल तितकी होऊं देणें व असें घडवून आणण्याचा मुख्य उपाय म्हणजे सार्वजनिक वक्ते व लेखक यांनीं चालू व्याकरणाचा अभ्यास काळजीपूर्वक करणें हाच होय. हल्लीं कोणत्याहि भाषेच्या व्याकरणाच्या अभ्यासाची चालढकल व हेटाळणीहि होते. इंग्रजी भाषेंत अस्खलित व व्याकरणशुद्ध बोलणारे वक्ते आपापल्या जन्मभाषेंत बोलतांना व्याकरणदृष्ट्या चुका करतात याचें कारण आपली जन्मभाषा, तिच्यावर मेहनत काय करावयाची, अशी जी भावना, ती नष्ट झाली पाहिजे.

# वागर्थविहार

( लेखकः—गो. कृ. मोडक. )

**आपल्या स्त्रियांची चढाई किंवा आक्रमणशीलता**—आपण (म्हणजे आपले पूर्वज) पूर्वी संस्कृत भाषा बोलत होतों, त्यावेळीं पुंलिंगी व स्त्रीलिंगी शब्दांच्या समुदायाचा निर्देश एका शब्दानें करितांना आपण पुं. शब्दाची योजना करीत होतों; जसें तौ गुरुर्गुरुपत्नी च प्रीत्या प्रतिननन्दतुः ( रघु. १.५७) (गुरू वसिष्ठ व त्याची पत्नी अरुंधती यांनीं त्या दोघांचें उलट अभिनंदन केलें ). या वाक्यांत राजा व राणी यांचेबद्दल पुं. तौ हा शब्द योजिला आहे. नपुंसकलिंगी किंवा स्त्रीलिंगी ते शब्द योजिला नाहीं. राजा व राणी यांचा एकत्र निर्देश एका पुं. शब्दानें होण्यास व्यवहारतः पुरुषाचें वर्चस्व पाहिजे, स्त्री. शब्दानें होण्यास स्त्रीचें पाहिजे, व न. शब्दानें होण्यास पुरुष व स्त्री दोघें तुल्य-बल पाहिजेत, हें उघड आहे. अशा स्थितींत संस्कृत भाषेंत हा निर्देश पुं. शब्दानें केला जातो, यावरून उघडच आहे कीं, पूर्वकाळीं आपले समाजांत पुरुषांचा वरचगडा होता. कालांतरानें आपली भाषा संस्कृतावरून मराठीवर आली. याच कालावधींत समाजांतील सापेक्ष वर्चस्वांतहि फरक होऊन मिश्रलिंगी समुदायाचा एकत्र निर्देश करण्यांतहि फरक पडला कसा ? संस्कृतांत राजा व राणी हे दोघेजण अशा रचनेचा प्रयोग होत असे, तर मराठींत राजा व राणी हीं दोघें असा प्रयोग होऊं लागला. तेथें काय दिसून येतें ? समुदायाच्या घटकांत नपुंसकलिंगी शब्द मुळींच नाहीं; तरी पण या एकत्र निर्देशांत नपुंसक लिंगाचा प्रवेश कसा झाला ! अर्थात् 'तुला नाहीं मला नाहीं, घाल कुत्र्याला' या न्यायानें, कोणासहि दुसऱ्याचें वर्चस्व सहन न झाल्यानें, तिसऱ्यालाच मान्यता देण्यांत आली आहे. ही समाजांतील क्रांती अशीच चालू राहिल्यास, म्हणजे स्त्रीजातीचें वर्चस्व वाढत राहिल्यास, आणखी कांहीं पिढ्यांनीं कदाचित् असा प्रसंग येईल कीं मिश्रलिंगी समुदायाचा निर्देश पुं. शब्दानें तर नाहींच, न. शब्दानेंहि नाहीं, तर तदन्य स्त्रीलिंगी शब्दानें होऊं लागेल. 'राजा व राणी या दोघी आल्या' असा प्रयोग करावा लागेल. हें भविष्य खरें वा खोटें होणें, हें सर्वस्वीं पुरुषांच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे. काय होईल, हें भविष्यकाळच दाखवील.

सारांश – राजा व राणी हे दोघे (पुं.) आले,—
असली रचना संस्कृत
राजा व राणी हीं दोघें (न.) आलीं,—
असली वर्तमान मराठी रचना
तर, राजा व राणी ह्या दोघी आल्या
अशी भविष्य कालीन मराठी रचना
काळाच्या ओघावरून अनुमित होते.

## आजन्म कीं आजीव ?

१ **विवक्षित अर्थ**:—एखाद्या संस्थेचा कोणी सभासद होतो तो मरेपर्यंत सभासद म्हणून राहण्याच्या उद्देशानें होतो; कोणी निरनिराळ्या मुदतीपर्यंतचेहि होतात. असे सभासदांत निरनिराळे प्रकार असतात. पैकीं प्रथमोक्त सभासदास **आजन्म** असें विशेषण लावितात. येथें विचार करावयाचा तो या गोष्टीचा कीं विवक्षित अर्थाचा बोध करण्यास आजन्म हें विशेषण योग्य आहे काय ?

२ **विशेषणाचा अर्थः**—आ म्हणजे पासून; पर्यंत किंवा भर; **जन्म** म्हणजे जनन, उत्पत्ति, किंवा जननाची वेळ. ही वेळ म्हणजे एक विशिष्ट क्षणच असल्यानें या वेळेशीं भर-चा अन्वय संभवत नाहीं. तेव्हां आजन्म याचा अर्थ होईल तो जन्मापासून किंवा जन्मापर्यंत. पैकीं 'जन्मापासून' हा अर्थ हि संभवत नाहीं; कारण सभासद कोणी होतो तो आपल्या आयुष्यांत केव्हां तरी, उपजतांच (प्रायः) नव्हे. जन्मापर्यंत याहि अर्थाचा निर्वाह होत नाहीं; कारण यांतील जन्म कोणता? पुढील. पण सभासदत्व मरणाबरोबरच संपणार; तें मरणोत्तर येणाऱ्या जन्माशीं मुळींच संबद्ध नाहीं. यावरून उघड होतें कीं विवक्षित अर्थाचे द्योतनास आजन्म हा शब्द सर्वथा अक्षम आहे.

३ **सुचविलेला शब्द**—जीव किंवा जीवन यांचा अर्थ जिवन्त राहणें किंवा तत्सूचित अवधि असा आहे. 'जिवंत राहण्याच्या अवधीभर,' **'जिवंत असेपर्यंत'** असा अर्थ आपणांस व्यक्त करावयाचा आहे. हाच अर्थ आजीवन किंवा (संक्षेपार्थ) आजीव या समासानें उक्त होत आहे. करितां प्रचारांत आजन्म सभासदचे स्थानीं आजीव सभासद असा प्रयोग करावा.

## कानाडोळा करणें

१ **प्राथमिक व लाक्षणिक अर्थः**—'सकल' शब्दाचा प्राथमिक अर्थ कलांनीं युक्त, सोळाव्याहि अंशांनीं युक्त, असा आहे. हल्लीं त्याचा उपयोग 'संपूर्ण' अशा अर्थी करतात. हा उपयोग करितांना अंशाचा विचार मुळींच केला जात नाहीं. विवक्षित वस्तूला अंश असोत वा नसोत, ती संपूर्ण असली म्हणजे तिला सकल—सगळा हा शब्द लावण्यांत येतो. कलायुक्त-चा व संपूर्ण-चा अर्थात् काय संबंध आहे बरें! कलायुक्त याचा अर्थ संपूर्ण कां होऊं लागला असावा? कलायुक्त, हा अर्थ प्राथमिक आहे, तर संपूर्ण हा अर्थ लाक्षणिक आहे. येथील अर्थांतर होण्यास अशी एखादी परिस्थिति असली पाहिजे कीं जींत प्राथमिक अर्थ अटीचे रूपाचा व लाक्षणिक अर्थ परिणामाचे रूपाचा आहे. प्राथमिक अर्थ विद्यमान असेल तरच लाक्षणिक अर्थ संभवेल, अशी स्थिति पाहिजे. **प्राथमिक अर्थ समय** (म्हणजेच अट) **व लाक्षणिक फल** (किंवा अटीचा परिणाम) **असला पाहिजे.**

२ **दोन्ही अर्थांचें सहावस्थानः**—चंद्र संपूर्ण केव्हां असतो? तो पूर्ण असण्याला कसा असावा लागतो? चंद्राच्या (सर्व) कला जेव्हां विद्यमान असतात तेव्हां चंद्रास पूर्ण म्हणतात. चंद्राचे संबंधानें असें म्हणतां येईल कीं चंद्र **कलायुक्त असल्यास पूर्ण** असतो. येथें प्राथमिक अर्थ कलायुक्त हा लाक्षणिक अर्थ संपूर्ण याचा समय किंवा अट झाला आहे. सारांश येथें कलायुक्त ही पूर्ण होण्याची अट आहे. अशा रीतीनें कधींकधीं प्राथमिक अर्थावरून लाक्षणिक अर्थ प्रवृत्त होत असतो. दोन अर्थांमध्यें संबंध असणारच. हा संबंध समय—फल किंवा अट—परिणाम, अशा रूपाचा कधीं कधीं असतो.

३ **प्रस्तुत उक्तिविशेषाचे अर्थः**—संस्कृतांत काण म्ह० अंधळा. तरीपण हा शब्द दोन्ही डोळे अंध असल्यास लावीत नाहींत. जेव्हां एकच डोळा अंधळा असतो तेव्हांच लावितात. शुकः काणः, धृतराष्ट्रः अन्धः, असे प्रयोग आढळतात. अवयवाचा विशेषणभूत असलेला हा शब्द येथें व्यक्तीस लाविला आहे. आतां एखाद्या मनुष्यास एकच डोळा डोळस आहे व दुसरा अंधळा आहे, अशा स्थितींत त्याला वस्तु पहावयाची असल्यास त्यानें त्या वस्तूकडे डोळस डोळा वळविला पाहिजे; जी पहावयाची नसेल तिच्याकडे काणा; एकाच वेळीं दोन्ही ठिकाणीं कमी अधिक लक्ष्य ठेवणें कधीं कधीं जरूर पडतें. अशा स्थितींत काणा—एक डोळ्याचा मनुष्य काय करील बरें? तो आट्यापाट्या खेळत असतांना, पाटी धरणारा व सुर्दुंग्या यांतून ज्याच्याकडे त्यास विशेष लक्ष्य द्यावयाचें असेल, त्याच्याकडे डोळस तो डोळा वळवील व

दुसऱ्याकडे काणा डोळा करील. येथें हेळसांड करणें, विशेष लक्ष्य न देणें, हा परिणाम साधण्याला अट कोणती बरें ? ज्याकडे लक्ष्य द्यावयाचें नाहीं त्याच्याकडे काना डोळा करणें. म्हणजे येथें काना डोळा करणें ही अट किंवा समय, लक्ष्य न देणें हा परिणाम किंवा फल होय. अशा रीतीनें एकाक्ष आख्या-पाख्या खेळणाऱ्याच्या विशिष्ट परिस्थितींत काना डोळा करणें याचा प्राथमिक अर्थ व विशिष्ट अर्थ हे सहावस्थायी आढळतात. तो काणा डोळा करितो म्हणजेच, किंवा तेव्हांच, तो दुर्लक्ष्य करितो. प्राथमिक व लाक्षणिक अर्थ येथें समानाधिकरण ठरतात, तसेच ते एखाद्या प्रसिद्ध, सर्वविदित अशा गोष्टींत ठर-ल्यास, ती गोष्ट आपल्या प्रसिद्धीमुळें, हा दोन अर्थांतील संबंध श्रोत्याचे मनांत त्वरित अनायासें भरवून देईल. अशी गोष्ट एक डोळ्या हरिणीची आपल्या परिचयाची आहे. पण ती ईसापनीतींतून आलीं असल्यानें, येथें दोन अनुमानें निघतात. तीं अशीं. या गोष्टीचे परिचयानंतर काना डोळा करणें (= दुर्लक्ष्य करणें ) हा उक्तिविशेष प्रवृत्त झाला असावा; किंवा (२) तीच गोष्ट आपल्या लोककथांमध्यें कोणत्याना कोणत्यातरी रूपानें पूर्वीच प्रचलित असावी. कोणतेंहि अनुमान केलें तरी अशी एखादी गोष्ट स्तुत अर्थांतराचे मुळाशीं असावी, हें निर्विवाद होय.

**४ सारांशः**—एखाद्या गोष्टीकडे दुर्लक्ष्य करावयाचें असल्यास, तें त्या वस्तूकडे अंधळा डोळा वळविल्यानें साधतें, या वस्तुस्थितीस अनुलक्षून प्रस्तुत अर्थांतर प्रवृत्त झालेलें दिसतें.

---

**कठीण कसोटीः**—( ले. वासुदेव विनायक जोशी. "सरसवाङ्मयरत्नमालेचें" ७६ वें रम्यरत्न. किं. २ रुपये.

कादंबरीमंदिरांत रा. वासुदेवराव जोशी यांनीं प्रथमच टाकलेलें पाऊल तेथेंच चिकटून राहील कीं काय अशी भीति वाटते. कारण प्रथम प्रयत्न करीत असतांना एखाद्या परभाषेंत लिहिलेल्या कथेला मराठी वेश देण्याच्या ऐवजीं स्वतंत्ररचना कर-ण्याची धडाडी त्यांनीं केली ही एकच गोष्ट त्यांच्या एतद्विषयक कर्तृत्वाची साक्ष पट-वीत आहे.

या कादंबरीच्या द्वारानें नवीन सिद्धांत अथवा कोणतें मत प्रतिपादन कर-ण्याचा उद्देश लेखकानें आपल्यापुढें ठेवला आहे हें नीट लक्षांत येत नसल्यामुळें मिश्र विवाहांच्या उत्तेजनार्थ ही कादंबरी रचली असावी असें मानलें तर त्यासहि कांहीं प्रतिबंधक गोष्टी आहेत. एका अज्ञान वयांतील मुलानें एका मराठा मुलीशीं लग्न लावलें खरें, परंतु तो तरुण अल्पवयींच निवर्तल्यामुळें त्या मिश्र विवाहानें विवाहितांनीं संसारसुख कोणत्या प्रकारानें अनुभवलें हें समजण्यास अर्थात्‌च मार्ग नाहीं. दुसऱ्या योजिलेल्या मिश्रसंबंधांत एका भोळ्या प्रभुज्ञातीय मुलीला फसविण्याचाच एका तरुण मराठ्याचा

हेतू असल्यामुळें त्यांच्या संबंधाला विवाहाचें स्वरूप प्राप्त झालें नाहीं. तात्पर्य, कठीण कसोटी ही कादंबरी ही एक निश्चित उद्देश मनांत न धरतां लिहिलेली गोष्ट आहे.

या कादंबरीचें रोहिणी हें उपनांव आहे. व हें रोहिणीचेंच करुणास्पद चित्र म्हणावें तर ताराबाई प्रधान हिचेंहि रोहिणीप्रमाणेंच संपूर्ण चरित्र या कादंबरींत वर्णिलेलें आहे. एकंदरींत कादंबरी बरी आहे असें जरी बिनदिक्कत म्हणतां आलें तरी आमच्या मतें या कादंबरींत बरेच दोष राहिले आहेत. या कादंबरींत रोहिणीचेंच कायतें वर्तन आरंभापासून अखेरपर्यंत जसें असावयास पाहिजे तसें असलेलें दिसतें. रोहिणीचें व भय्यासाहेबांचें लग्न लवकरच लागल्यामुळें भय्यासाहेबाला जिवंत ठेवण्याचें प्रयोजनच राहिलें नाहीं. त्यामुळें तो लवकरच मेला हें ठीक झालें. पण तारेच्या आईला आगींत जळून मारण्यांत लेखकानें आपल्याला तिचें जिवंत रहाणें व्यर्थ नढूं नये येवढेंच पाहिलें असावें असें वाटतें.

तारेची व विजयाची जर कायमची गांठ पुढें घालावयाची होती तर तिचा शामरावाशीं संबंध झाला नसता तर बरें झालें असतें. विजयाला पश्चात्ताप कां व कसा झाला हें कोडें कांहीं केल्या उलगडत नाहीं. मोटारीच्या अपघातामुळें त्याच्या मनांत विरक्ति उत्पन्न झाली असें म्हणावें तर त्या दुखण्यांतच तारेला फसविण्याचा त्याचा उद्देश उघड दिसून येतो. आजवर केलेल्या पापांचें क्षालन करण्याची बुद्धि खरोखरच जर विजयाला झाली असती तर त्यानें आपण होऊनच त्याची हतभागी भार्या जी गंगू तिला घरीं बोलवून घेतलें असतें. पण गंगूकरितां तारेला त्याच्याकडे काकुळतीनें रदवदली करावी लागली. भय्यासाहेब जिवंत असेपर्यंत विजयाच्या पुढें दिसून येणाऱ्या बदफैली स्वभावाचें पूर्व चिन्ह त्याच्या पूर्व वयांत सूक्ष्मरीतीनें वाचकांच्या निदर्शनास आणावयास पाहिजे असें आम्हांस वाटतें. लफंग्या विजयाशीं पुनर्मीलन करण्यास तारा प्रवृत्त झाली यांत तिचें व्यावहारिक चातुर्य किंवा भाबडा स्वभाव जरी असला तरी ती बाणेदार किंवा तेजस्वी स्वभावाची स्त्री नव्हती हें उघड होतें. रोहिणीवर असह्य संकटें आणण्याकरितां रामरावाला दिल्लीचा भामट्या बनवावा लागला पण तसें करितांना माईसाहेबांचा करारी स्वभाव, त्यांची व्यवहारदक्षता, यांच्यावर विरजण पडलें हें या कादंबरींत एक गौणच आहे असें आम्हांस वाटतें. ज्या धनंजयामुळें रोहिणीनें गोड दिवस पाहिले तो धनंजय बराच काळ वाचकांच्या दृष्टिआड होतो. आपल्याला आवडेल त्या मुलीबरोबर लग्न लावणें हेंच आयुष्याचें ध्येय असें मानणारे नायक हल्लींचे कादंबरीकार समाजापुढें आदर्श म्हणून ठेवतात त्यांचेंच थोडेसें अनुकरण रा. वासुदेवराव यांनीं केलें आहे, याचेंच आम्हांस वाईट वाटतें.

याप्रमाणें या कादबरींत जरी कांहीं लहान मोठे दोष असले तरी ही कादंबरी वाचनीय झाली आहे असेंच म्हटलें पाहिजे. कादंबरी झाली तरी छपाई वाईट व किंमत पुष्कळ असणें चांगलें नाहीं. अखेरीस या नूतन अर्धयशस्वी प्रयत्नाबद्दल आम्ही रा. वासुदेवराव जोशी यांचें अभिनंदन करतों.

# स्त्रियांचीं गाणीं

### १ धरणीला पाणी घालतांना म्हणावयाचें गाणें

धरणी धरणी माये बहिणी । तुला घालीन गंगेचें पाणी ॥
गंगेच्या पाण्यासारखा भ्रतार दे । सावित्रीसारखें सौभाग्य दे ॥
लक्ष्मीसारख्या सुना दे । पान्यापुऱ्यांनीं भरली दुरडी ॥
वर घातला कोरा शेला । शंकर पुसतो पार्वतीला ॥
ही कोण कोठें जाते ? । धरणीची पूजा करते ॥
त्यानीं काय होतें ? । अखंड सौभाग्य येतें ॥
सोन्याच्या चुड्यांनीं वैकुंठीं जाते । अंतकाळीं महाविष्णूची भेट होते ॥

### २ स्नानानंतर म्हणावयाचें गाणें

रामनामाची बुचकळी । आणिक नलगेचि आंघोळी ॥
पार्वती म्हणे देवा । हा मंत्र मजला द्यावा ॥
आहे सोपाचि बरवा ॥ येतां जातां होईल ज्ञान ॥
अंतरीं ध्यान रामाचें । राम भैरव-भजनी ॥
राम दशरथनंदनी । राम कृपेचे सागर ॥
राम दीनांचें माहेर । राम शाखल्य दिनकर ॥
रामकंठीं तुळशीमाळा । राम नेसले सानेसळा ॥
अर्धांगी पार्वती पतिव्रता । वरी चंदन पुरता ॥

### ३ रामाचें महिमांगद

अहिल्या द्रौपदी उद्धरली पूर्ण । विभूतीचा दिवा लावून ॥
आपण वसते वसिष्ठ । क्षीरसागरीं तारी बाप्पा ॥
पडदणीला घातला घाव । जागे झाले माधवराव ॥
पडदणीचा केला पिळा । वरती लिला गोविंदाची ॥
पडदणीची घातली घडी । भरली थडी गंगेची ॥

### ४

गंगेसी जावें नित्य वदावें । जेवणं भक्षण करुनि रहावें ॥
देणें कोणाचें कवडी नसावें । विश्वेश्वराच्या नगरीं असावें ॥
गंगे तुला मी देह अर्पिला गे । सांडूं मला तूं सहसा नको गे ॥
गंगेसी जातां बहु सूख वाटे । गोविंद तेथें मज नित्य भेटे ॥

### कुंकू ५

सूर्यनारायण उगवला पहिल्या प्रहरीं । पावला मज अंतरीं ॥
पूजा केली रात्र फळीं । जैसे द्रोपदीला पावे ॥
तैसे मला पावो । थुंकू दान कुंकू पान ॥
शेज बाज पुत्राचें राज्य । अव्य मरण पिवळ पातळ पिवळी चोळी ॥
सूर्यनारायण आणिक मी मागेन । तर तुझ्या गळ्याची आण ॥

### ६ केर काढतांना म्हणावयाचें गाणें

हातीं घेतली झाडणी । झाडीत होते विश्व नहाणी ॥
तिथें भेटली माय भवानी । तिनें गर्भवास चुकविला ॥

### ७ दिवे लावल्यावर म्हणावयाचें गाणें

लक्ष्मीबाई हो सारजा । लक्ष्मीबाई हो गिरजा ॥
तिचा वर्ण जो सांवळा । कंठीं नवरत्नांच्या माळा ॥
लक्ष्मी रत्न निवाली । लक्ष्मी पलंग पासोडा ॥

### ८ तुळशीची पूजा

वृंदावन केलें देहाचें । रोप लावलें तुळशीचें ॥
भावें पूजा मी मांडीली । राधा दामोदर पूजीला ॥
प्राणभक्त माझा आला । भक्तिदीप पाजळीला ॥
धन्य धन्य वृंदावन । भोंवतीं तुळशीचें वन ॥
मी तर अज्ञान लेकरूं । कृपेंकरूनि वाढविलें ॥
मायबंधांनीं जोडीलें । तुळस भेटली भ्रांत फीटली ॥
राधा रखमाईसहित । द्वारका भेटली ॥

### ९ तुळशीची वेणी

तुळसादेवीची वेणी घालावी । आलें ग माझ्या मनीं ॥
भक्तीमुक्तीची तेलफणी । उभी ग हातीं घेउनी ॥
तुळसादेवीला अंगणीं । वसविली सगुण भांग केला ॥
निर्गुणाचें पिंपळवण । कसें शोभतें तीला ॥
अहंकाराचा जाण केवडा । अभिमान राखडी ॥
हौस मौजेची मूद कोयरी । आवळा तुळशी आवडी ॥
रायआवळा बहुत । दिसतो कर्णाजवळ ॥
कुशल आनंदाचे । मोर बसविले ॥
खोविला आंबा सुंदर । तुळसादेवीते मुखचंद्रमा ॥



अनुक्रमणिका

केला असे समोर । दोहो बाजूनें॥
केस सारखे । केले शोभे सुंदर ॥
काशीनामें शेंदूर । भरला भांगामध्यें टिकली ॥
भांग पसरूनी । जाळी मोत्यांची ॥
माथ्यावरी शोभली । कल्पनेनें कुंकू लावीलें ॥
तुळसादेवीला चिरी । अनन्यभावें हरिचरणाच्या ॥
पदीं लागली कशी । मनांत होतें वेणी घातली तुळशी ॥
अनन्य भावें हरिचरणाच्या । पदीं लागली कशी ॥

महादेव विनायक डोंगरे, महाड.

---

### १ तुळशीचें गाणें

आले आले तुळशीपाशीं । आधीं देखिली गोमाया ॥
नेसले पीतांबर घटी । तुळशीपाशीं कमळापती ॥
तुळशींची सेवा घडे । रामनामाचीं घस्त फिरे ॥
येवढी तुळशीची महीमा । जाती पातळे धुळे कर्मा ॥
आपण देह परमात्मा । वृंदावन केले देहाचे ॥
झाड लाविलं तुळशीचं । भावें पूजा बांधिली ॥
राधादामोदर पूजीली । प्राण भक्त माझे आले ॥
नेत्रदीप उजलेले । धन्य धन्य वृंदावन ॥
देखिलं तुळशीचं बन । शुद्ध केलं अंतःकरण ॥
वासना नेवैद्य ठेविला । मी तरी अज्ञान लेकरूं ॥
मन माझं घेत पुष्पांजळी । प्रेमें करूनी वाढविलें ॥
माया बंधन सोडवील । ध्यान धरलं विष्णूचें ॥
महाविष्णूची लक्ष्मी । सेवा करीतां चंदने चर्चितां ॥
आरती करतें हो ही हातीं । कृष्णा रुक्मीणीसहीत द्वारका भेटती ॥

### २ नंदीचें दर्शन घेतांना

नंदि नंदी निंदूं नको । पुच्छानं देऊं नको ॥
शिंगानें मारूं नको । दे बसायला पाट ॥
दाखिव वैकुंठाची वाट । यम येतील कुणाचे ॥
आले होते यमाचे । परंतु न आले शिवाचे ॥
मी जातें पूजेला । माझा नमस्कार शिवापार्वतीला ॥



अनुक्रमणिका

### ३ गंगेजी पूजा

गंगेच्या तीरीं सदाशीव राजा । माणकामोत्यांची पूजा
गरूडाचा पहार पंचामृताची गळती । सदाशीव विसर खेळती ॥
सदाशीवाला बेल वाईल । तो संतुष्ट झाला ॥
गंगेपाशीं पुसूं गेला । संतत संपत घरा येवो ॥
घरांतली पीडा बाहेर जावो । काशीस जातां बिऱ्हाड मुक्ति ॥
बेलाचें पान शिवाचें ध्यान । माझी पूजा गंगेस मोत्यामाणका समान॥

### ४ स्नानानंतर गंगेकडे वळून बघून

परतून पाहिली भागीरथी । शंख चक्रगदा हातीं ॥
जवळ उभे कमळापती । त्यास माझा नमस्कार ॥

--कु. अंबूताई गोखले.

---

## दृष्ट

### १ दृष्ट काढणें

दृष्ट दृष्ट । आल्या गेल्याची । झाडा झुडाची ॥
उंच माणसाची । ठेंगण्या माणसाची ॥
काळ्या गोऱ्याची । वाण्या उदम्याची ॥
भिल्ला कोळ्याची । तेल्या तांबोळ्याची ॥
महारा-मांगाची । ज्यानें केली असेल ॥
त्याच्या नांवानें । मीठ मोहऱ्या ॥
पाटीभर गोंवऱ्या । रामलक्ष्मणाची ॥
उतरली तशी । माझ्या बाळाची उतरो ॥

### २ जोड्यानें दृष्ट काढणें

पायासरशी आली । खेटरासरशी गेली ॥

### ३ केरसुणीनें दृष्ट काढणें

मांगाची पोर । न्हाली धुली ॥
काळें लुगडें नेसली । काळी चोळी घातली ॥
सवरात केला । दृष्ट घेऊन जा घरा ॥

महादेव विनायक डोंगरे, महाड.

# कथा

[ सं. महादेव विनायक डोंगरे, महाड ]

एका राजाच्या पदरीं एक मोठा विद्वान् पंडित होता. त्याची अशी ख्याति होती कीं कोणीहि येऊन त्याच्याशीं वाद करावा, तो कधींहि हरावयचा नाहीं. राजाला त्याचा फार अभिमान होता. पुढें कालेंकरून तो मृत्युवश झाला. त्याला दोन मुलगे होते. पण ते अगदीं ठोंबे होते. एकालाहि कांहीं अक्कल नव्हती. राजानें त्यांना मोठ्या सन्मानानें दरबारांत बोलावून आपल्या वडिलांची परंपरा राखण्याची विनंती केली. त्यांनींहि हो हो म्हणून वेळ मारून नेली. पुढें एक पंडित दिवसा मशाली लावून वाद करण्यासाठीं दरबारांत आला. राजानें त्या दोन मुलांना बोलावणें पाठवलें. मुलगे मोठ्या विवंचनेंत पडले. त्यांच्या वडिलांचा एक तेली स्नेही होता. त्याच्याकडे जाऊन ते म्हणाले कीं आतां कसेंहि करून आमची अब्रू राख. तो म्हणाला ठीक आहे. उद्यां वादाचा दिवस ठरवा. त्याप्रमाणें दरबारांत निरोप पाठवला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्या तेल्यानें सात भाकऱ्या व बरोबर एक दह्याची कथली घेतली व ते तिघे दरबारांत जाण्यास निघाले. वादाला तयारी आहे म्हणून सांगतांच मुलांनीं तेल्याला पुढें केलें व ह्या आमच्या शिष्याशींच प्रथम वाद करावा म्हणून सांगितलें. आलेल्या पंडितानें प्रथम फक्त पांच बोटें दाखविलीं. त्यावर तेल्यानें मूठ वळून दाखविली. नंतर त्यानें काय? असा प्रश्न हाताच्या खुणेनें विचारला. तेव्हां तेल्यानें बरोबर आणलेल्या भाकऱ्या पुढें ठेविल्या. त्यानें पुन्हा काय अशी खूण करतांच त्या भाकऱ्या अर्ध्या अर्ध्या करून दाखविल्या. पुन्हा पंडितानें तोच प्रश्न केला. तेल्यानें आपलें दह्याचें गाडगें त्याच्यापुढें ठेवलें. पंडितानें आपल्या मशाली विझविल्या व शिष्यांसह मुकाट्यानें निघून गेला. राजाला फार आनंद झाला. व त्यानें दोघां मुलांचा व तेल्याचा मोठा सन्मान करून त्यांस मेण्यांतून घरीं पोंचविलें. झाला हा सर्व प्रकार उभयपक्षीं कोणी एक अक्षरहि न बोलतां मुकाट्यानेंच झाला. तेव्हां ते मुलगे, पंडिताचे शिष्य व सर्व सभाजन आश्चर्यचकित झाले व त्या तेल्याची वाखाणणी करूं लागले. घरीं आल्यावर ह्याचा अर्थ काय म्हणून मुलांनीं तेल्याला विचारलें. तो म्हणाला 'प्रथम त्या पंडितानें पांच बोटें दाखविलीं व एक चपराक देईन म्हणून सुचविलें. मी त्यास मूठ वळून एक गुद्दा देईन म्हणून सांगितलें. तेव्हां हा एवढा बलवान् मनुष्य दिसतो. तर ह्याचा आहार तरी काय असावा म्हणून विचारलें. मी सात भाकऱ्या दाखवल्या. त्यावर त्यानें ह्या एकदमच खातोस असा प्रश्न केला.मी त्या मोडून दाखवून साडेतीन सकाळीं व साडेतीन संध्याकाळीं असें सांगितलें. त्या कशाशीं खातोस असें विचारतांच मी दह्याचें मडकें पुढें ठेविलें. तेव्हां एवढ्या शक्ति-

वान् मनुष्याशीं वाद करण्यांत अर्थ नाहीं म्हणून तो मुकाट्यानें निघून गेला.' हें ऐकून त्या मुलांनीं त्या तेल्याच्या चातुर्याची फार प्रशंसा केली व वेळीं आपली अब्रू राखल्याबद्दल त्याचे फार फार आभार मानून त्यास मोठें बक्षीस दिलें. इकडे पंडिताचे शिष्य त्यास विचारूं लागले कीं "महाराज, आजपर्यंत आपणांस कधींहि कोणी वादांत जिंकलें नाहीं. आणि आज जो मूक प्रकार झाला त्याचा अर्थ तरी काय ? " पंडितानें उत्तर दिलें, "ज्यांच्या शिष्यानेंच माझ्या मुक्या प्रश्नांचीं उत्तरें खुणेनेंच दिलीं त्यांजजवळ वाद करण्यांत काय होईल ? प्रथम मी त्यास पांच बोटें दाखवून जग हें पंचभूतात्मक आहे असें सुचविलें. त्यावर त्यानें पांच बोटें मिटून दाखवून पंचभूतांच्या एकीकरणानेंच मनुष्य देहनिर्माण झाला आहे असें सांगितलें. नंतर लोक किती असें विचारतांच त्यानें सात असें भाकऱ्यांच्या सहाय्यानें सुचविलें. त्यांची विभागणी करून ते सप्तलोक दधिसमुद्रानें विभागले गेले आहेत असें दह्याच्या मडक्यानें सुचविलें. इतकी उत्तरें प्रश्न मनांतच ओळखून दिल्यामुळें पुढें वाद करण्यांत अर्थ नाहीं असे समजून मशाली मालवून मी परत आलों."

---

# कथा

### ( सं.—महादेव विनायक डोंगरे )

एक होती चिमणी. तिच्याकडे होती पितृपक्षी अमावास्या. त्या दिवशीं तिनें खीर केली होती. करतांकरतां त्यांतच ती पडली. चिमणा गेला होता आंघोळीला. तो आल्यावर पहातो तों चिमणी कोठें दिसेना. त्यानें नैवेद्य दाखवलान् व आपलें पान वाढून घेतलेंन्. तों खीर घेतांना त्यांतली चिमणी त्याच्या पानांत पडली. तो पटकन् उठला व उखळांत लोळूं लागला. तिकडून आला एक कावळा. तो म्हणाला "चिमण्या, चिमण्या, कां रे लोळतोस ? " चिमणा उत्तर करतो:—

"चिमणी पडली खिरींत, चिमणा करतो गुट्टू गुट्टू
कावळ्याचा डोळा फुट्टू"

त्याबरोबर कावळ्याचा डोळा फुटला. तो भुरदिशीं उडून वडाच्या झाडावर जाऊन बसला. वड विचारतो "का रे कावळ्या तुझा डोळा फुटला ? " कावळा म्हणतो:—

"चिमणी पडली खिरींत, चिमणा करतो गुट्टू गुट्टू
कावळ्याचा डोळा फुट्टू, वडाची पानें गळू"

त्याबरोबर वडाचीं पानें गळून पडलीं. रोजच्याप्रमाणें गाईम्हशी सावलींत बसायला

आल्या तों सावलीच नाहीं. तेव्हां त्या विचारतात "काय रे वडा, तुझी सावली काय झाली ?" वड म्हणतो "काय सांगू ?

चिमणी पडली खिरींत, चिमणा करतो गुट्टू गुट्टू
कावळयाचा डोळा फुट्टू, वडाचीं पानें गळू,
गाई-म्हशी शिंग मोडूं"

त्यावरोबर गाई-म्हशींचीं शिंगें मोडून पडलीं, त्या गेल्या नदीवर पाणी पिण्यासाठीं. नदी विचारते "काय हो तुमचीं शिंगें काय झालीं ?"

गाई-म्हशी उत्तर करतातः— काय सांगूं ?
चिमणी पडली खिरींत, चिमणा करतो गुट्टू गुट्टू
कावळयाचा डोळा फुट्टू, वडाचीं पानें गळू,
गाई-म्हशी शिंग मोडू, नदी खडखडू"

त्यावरोबर नदीच्या पाण्याचा खडखडाट झाला. मोर नदीवर पाणी पिण्यासाठीं आला. तो विचारतो, "काय ग नदी, पाणी काय झालें ? ती म्हणतेः— "काय सांगू ?

चिमणी पडली खिरींत, चिमणा करतो गुट्टू गुट्टू
कावळयाचा डोळा फुट्टू, वडाचीं पानें गळू,
गाई-म्हशी शिंग मोडू, नदी खडखडू, मोर लांडा."

त्यावरोबर मोराचा पिसारा गळून पडला व तो लांडा झाला. तो गेला तीळ खायला. तीळ विचारतो, "काय रे झाला मोरा तुझा पिसारा ?" मोर म्हणतो काय सांगू ?

चिमणी पडली खिरींत, चिमणा करतो गुट्टू गुट्टू
कावळयाचा डोळा फुट्टू, वडाचीं पानें गळू,
गाई-म्हशी शिंग मोडू, नदी खडखडू,
मोर लांडा, तीळ दांडा."

तिळाचा मालक आला. तो म्हणतो "तीळ दांडा का झाला ?" तीळ म्हणतो काय सांगू ?

चिमणी पडली खिरींत, चिमणा करतो गुट्टू गुट्टू,
कावळयाचा डोळा फुट्टू वडाचीं पानें गळू,
गाई-म्हशीं शिंग मोडू नदी खडखडू,
मोर लांडा, तीळ दांडा,
पाटील मुंडा."

तशी पाटील डोक्याला फडकें बांधून घरीं आला. पाटलीण विचारते "कां हो असें कां ?" पाटील म्हणतो "काय सांगू ?"

चिमणी पडली खिरींत, चिमणा करतो गुट्टू गुट्टू
कावळयाचा डोळा फुट्टू, वडाची पानें गळू,
गाई-म्हशी शिंग मोडू, नदी खडखडू,



अनुक्रमणिका

मोर लांडा, तीळ दांडा,
पाटील मुंडा, पाटलीण पिचकी, "
शेजारीण आली ताक मागायला. ती विचारते " कां हो पाटलीण बाई असें कां ?
ती म्हणते काय सांगू ?
चिमणी पडली खिरींत' चिमणा करतो गुट्टू गुट्टू
कावळ्याचा डोळा फुटू, वडाचीं पानें गळू,
गाई-म्हशी शिंग मोडू, नदी खडखडू,
मोर लांडा, तीळ दांडा,
पाटील मुंडा, पाटलीण पिचकी,
शेजारीण दांतनिसकी.

---

**आमोदः**—(प्रकाशक—दत्तात्रेय—बळवंत कुळकर्णी, ३९८ वेताळ पेठ, पुणें; किं. ६ आणे.) विहंगमंडळाच्या सभासदांच्या कवितांचा हा संग्रह आहे.

हें गीत तुझ्यास्तव रसिका न दुज्यासाठीं
सोडून अरसिकां तुझ्या लागलों पाठीं

अशी विज्ञप्ति रसिकांस रा. कुळकर्णी यांनीं केली आहे. या कवितांचा आमोद रसिकांनीं एकदा घेऊन पाहावा.

**गीताधर्ममंडळः**—( पंचम वार्षिक वृत्तांत.—प्रकाशक ग. वि. केतकर, चिटणीस ) या वृत्तांतावरून मंडळाचें कार्यक्षेत्र विस्तार पावत आहे हें उघड दिसतें. गीतेची शिकवणूक—मग ती कोणती कां असेना इतक्या लोकांच्या मनावर बिंबली तर विलक्षण क्रांति होईल.

**स्वराज्याचा सुदीनः**—( ले. स. वा. धामणकर—आपटें जि. कुलाबा. किं. १२ आणे. ) श्री. धामणकरांनीं हें पांच अंकी नाटक सुशिक्षित वाचकांकरतां स्वराज्याचा प्रश्न कसा सुटेल हें दाखविण्याच्या हेतूनें लिहिलें आहे. श्री. धामणकरांची कल्पकता असामान्य असून त्यांची भाषा त्यांच्या सणसणीत विचारास योग्य अशीच आहे. पैसे मिळविण्याकरतां हें नाटक रचलेलें नाहीं. हें देशस्थितिचिंतनाचें फल होय. ह्या नाटकाची चहा होईल त्यावरून आमच्यांत सुशिक्षित वाचकवर्ग किती मोठा आहे तें आपोआपच कळून येणार आहे. रंगभूमीवर हें नाटक लवकर येवो. स्वराज्य मिळविण्यास भाषेंतील अनुस्वार गाळले पाहिजेत असा सिद्धांत लवकरच प्रतिपादन केला जाईल असें वाटतें. श्री. धामणकरांनीं आपल्या पुस्तकांत अनुस्वारांचें उच्चाटन केलें आहे. वीरांच्या भाषेंत अनुस्वार आहेत कीं नाहींत याचा शोध कोणी केल्यास बरें होईल !

६०

पा.नं. ६१ ते ८०

# सामाजिक टांचणें

(लेखकः—ना. गो. चापेकर)

जात म्हणजे एक अभेद्य किल्लाच होय. भिन्न जातींची मुलगी विवाहाच्या द्वारानें आपल्या जातींत न घेण्यानें जातीचें संरक्षण केलें जातें व जातीचा जातपणा सिद्ध होतो. अर्थात् जात मोडणें म्हणजे परजातीची मुलगी करणें होय. खाण्यापिण्यानें जात मोडत नाहीं. जातीबाहेर विवाह केल्यानेंच मोडते. कारण वरिष्ठ जातीशीं कनिष्ट जातीचा रोटीव्यवहार होतो. वरिष्ठ जातीच्या माणसानें कनिष्ठ जातीच्या माणसाकडे अन्नव्यवहार केला तरी सुद्धां प्रायश्चित्त घेतल्यावर जातींत राहतां येतें. अशुद्धतेच्या पलीकडे त्याला दोष नाहीं. रजस्वला ज्याप्रमाणें चार दिवस अस्पृश्य मानली जाते तद्वत् प्रायश्चित्त घेईपर्यंत खालच्या जातीशीं अन्नव्यवहार करणारा अशुद्ध अथवा अस्पृश्य राहतो इतकेंच. जाती फक्त हिंदूंत आहेत. मग हिंद्वितरांशीं संबंध घडला तर त्याचा परिणाम काय सम-जयाचा हा अत्यंत विकट प्रश्न आहे. कारण हिंदूंतील जातीजातींमधील व्यवहार रूढीनें ठरून गेले आहेत. जातिप्रधान हिंदूसमाजाचा विचार शास्त्रानें केलाच नाहीं. पण आज येथें या प्रश्नाचा विचार कर्तव्य नाहीं. जातींत ज्या रूढी आहेत त्यांवरून जातींचें स्वरूप समजून घ्यावयाचें आहे. स्त्रियांच्या व्यभिचारावरून हें स्वरूप निश्चित करण्यास आपणांस एक साधन मिळण्यासारखें आहे. प्रत्येक जातीला वरिष्ठकनिष्ठपणाची जाणीव आहे. पण ती नैतिक स्वरूपाची आहे. कोणत्याहि जातींतील स्त्रीनें त्या जातीच्या खालच्या जातींतील पुरुषाशीं शरीरसंबंध केल्यास तिला परत जातींत घेत नाहींत. एका ठाकराची लग्न झालेली व नवरा असलेली मुलगी पहिली बायको असलेल्या एका कातकऱ्याचा हात धरून गेली. कातकऱ्यांची जात आपणांहून कमी प्रतीची असें ठाकूर समजतात व कातकरी हि तें मान्य करतात. ही मुलगी आतां जातीमध्यें परत घेणें अशक्य असल्यामुळें तिचा बाप आणि नवरा तिच्या नांवानें पिंड पाडणार आणि मडकें फोडणार. अर्थात् ती मेली असें ठाकूर जात मानणार. आतां हीच मुलगी ठाकूर जी वरिष्ट जात समजतात त्या जातींतील पुरुषाबरोबर दुर्वर्तन करती तरी सुद्धां तिला परत जातींत घेऊन तिच्याबरोबर कोणीहि लग्न लावणार नाहीं. तिच्या हातचें अन्नपाणी घेण्यास मात्र हर-कत नाहीं. तिला जर या व्यभिचारापासून संतती होईल तर ती अकरमाशी म्हणूनच मानली जाईल. कोणीहि अस्सल ठाकूर, मुलगा असल्यास त्याला आपली मुलगी देणार नाहीं अगर मुलगी असल्यास ती आपल्या मुलाला करणार नाहीं. हें व्यभिचाराचें पाप नाहीं. जात मोडल्याचें आहे. कारण त्या मुलीनें आपला नवरा टाकून दुसऱ्या पुरुषाबरोबर पण आपल्याच जातीच्या—बदकर्म केलें तर दंड घेऊन तिला शुद्ध करून जातीपैकीं कोणीहि तिला लग्नाची बायको करून घेण्यास तयार होईल. यावरून असें दिसतें कीं कोणतीहि जात दुसऱ्या जातीला श्रेष्ठ समजून परबीज पतकरण्यास तयार नाहीं. असें करूं देणें म्हणजे जातीच्या अस्तित्वावरच घाला घालणें होय. शिवाय आपली जात म्हणजे एकबीजात्मक आहे अशी समजूत असली पाहिजे. स्त्रियांच्या संबंधानें आपल्या जातीचें बीज आणि परजातीचें बीज हाच भेद केला जातो. पतिबीज आणि पतीतरबीज असा भेद करीत नाहींत. समान दर्जाच्या जातींत रोटी-व्यवहार होतो. पण बेटीव्यवहार होत नाहीं. वरिष्ठ कनिष्ठ जातींत कनिष्ठ जात वरिष्ठ जातीकडे अन्न-व्यवहार करते, पण वरिष्ट जात कनिष्ठ जातीकडे जेवणखाण करीत नाहीं. पण एका जातींतली मुलगी दुसऱ्या जातींत कोणत्याहि कारणानें खपणार नाहीं. जातींचा वरिष्ठपणा आहारनिवृत्तींवर असावा. कातकरी उंदीर खातात. ठाकूर खात नाहीत. त्यामुळें ठाकूर कातकऱ्यांहून श्रेष्ठ.



अनुक्रमणिका

## हिंदूंपैकीं कित्येक जातींतील कांहीं रूढी.

१ बहिणीच्या केसाला भावानें जिवंतपणीं हात लावतां कामा नये. म्हणून बहीण सवाशीण मेली तर तिच्या प्रेताला न्हाऊं घातल्यावर तिच्या ओल्या केसांची वेणी भाऊ घालतो आणि मग प्रेत तिरडी-वर ठेवतात.

२ किंक्रांतीच्या दिवशीं सकाळीं पारोशा केरावर सवासणींची ओटी भरतात.

३ भोगीच्या दिवशीं केलेली भाकरी किंक्रांतीच्या दिवशीं घरांतील सासुरवासणीस खावयास देतात.

४ मुलीच्या तिसऱ्या वर्षी तिला पहिली परकरचोळी आतेनें नेसवली पाहिजे; तसेंच तिच्या पहिल्या बांगड्या आतेनें भरल्या पाहिजेत.

५ मुलीला दांत येऊं लागले म्हणजे आतेनें तिच्या दांतांवरून एकदा हात फिरवावा लागतो.

६ भाद्रपदांत मुली गौरी आणतात. तेव्हां गौरींचे खडे तळ्यांतून किंवा नदींतून डोळे मिटून काढतात आणि वाटेंत न बोलतांना त्या घरीं आणतात. घरीं आल्यावर घरांतील वयातीत बाई हातांत दिवा घेऊन त्या गौरींना हें दुभत्याचें फडताळ, हें धान्याचें कोठार, ही तिजोरी असे शब्द तोंडानें उच्चा-रून सर्व घर दाखविते.

---

# सारिकाशतकी

( संग्राहकः-काशिनाथ परशराम साने, शिक्षक राजुरी)

चातुर्यलतिका गुणसागरास पुनः बोलत आहे. विद्येचा प्रताप फिरोन सांगतें, श्रवण करावा. पूर्वी कैलासपर्वताचे श्रीसदाशिव आणि कुबेर उभयतां मित्र येकत्र बसोन विनोदेंकरून गोष्टी बोलत असतां सहजांत कुबेर म्हणाला कीं, सदाशिवा, त्रिभुवनांत द्रव्यसंपत्तिसमान वस्तु कांहीं नाहीं. हे ऐकून सदाशिव म्हणाला कीं, कुबेरा, तुला द्रव्यसंगें करून भ्रांति जाहाली आहे; परंतु विद्येसमान दुसरी वस्तु काय आहे? जिचे योगेंकरून परम पुरुषार्थ मोक्ष तोहि सिद्ध होतो तेथें इतर पदार्थाची कथा काय? हें सदाशिवाचें वचन कुबेरास अप्रमाणसारखें भासलें. तें हृद्गत समजोन कुबेराचा संदेह दूर करावा म्हणून आपले कंठांत वासुकी सर्प होता तो काढून कुबेरास सांगितलें कीं, विद्यासंपत्ति व द्रव्यसंपत्ति यांत उत्कर्ष कोणाचा आहे, तो चमत्कार कोणाचा तो तुजला दाखवितों. असें बोलून वासुकीस आज्ञा केली कीं, भूमंडलाचे ठाईं विबुधपुरीनामें नगर आहे तेथें भद्रबाहु राजा राज्य करितो. त्या स्थलीं तूं जाऊन आपले विषाग्नीनें तें नगर भस्मसात करून यावें. ही स्वामीची आज्ञा होतांच वासुकी भूलोकीं विबुधपुरीचे समीप आला आणि त्या नगरीस आपले शरीरानें वेढा घालून नगरद्वारासमोर मुख आणून विषाग्नीचे योगें नगर जाळावयास आरंभ करिता जाहला. किती एक नगरींचे पुत्र जळाले. प्रजांचा आक्रांत प्रवर्तला. या गोष्टीचा परिहार कसा करावा म्हणून राजा भद्रबाहु चिंताक्रांत जाहाला. उपरांत फौज सिद्ध करून पाठविली ती शंभर हाताचे अंतरें दग्ध जाहाली, कांहीं उपाय न चले. तेव्हां आपलें संपूर्ण द्रव्य बाहेर राजांगणीं ठेविलें आणि प्रतिज्ञा केली कीं या अनर्थाचा परिहार जो करील त्यास हें द्रव्य देईन. तथापि कोणी परिहार करावयास भेटेना मग लोकांस साष्टांग नमस्कार करून सांगितलें कीं या उपर माझे हातें तुमचें संरक्षण होत नाहीं, तुम्हांस सुचेल तो उपाय करून आपले प्राण वाचवावे. हें प्रभूचें वचन ऐकून प्रजा गतधैर्य होऊन मूर्छीत पडल्या. नंतर नगरीठाईं एक ब्राह्मण महा तपस्वी चंद्रशेखर या नामें सकल विद्याविशारद साधुशिरोमणि राहात होता. त्याणें ध्यानापासून विराम पावल्या नंतर हें वर्तमान ऐकिलें. प्रजांचा अकालीं संहार पाहून सदय जाहाला आणि तत्काल उठोन राजा भद्रबाहु याजवळ गेला. तो ब्राह्मण साक्षात् ईश्वरासमान भासून राजानें साष्टांग नमस्कार केला, मग सविस्तर वृत्तांत राजमुखें श्रवण करून चंद्रशेखर बोलिला कीं राजा मी हें वर्तमान ऐकून तुज समीप आलों, आजपर्यंत तुझे छायेखालीं राहून स्नानसंध्यादिकें निरुपद्रव काल नेला, हा तुझा प्रभाव. सांप्रत तुझ्यावर अपरिहार्य संकट प्राप्त जाहालें, त्यास या गोष्टींचा माझ्यानें होईल तो परिहार करून पाहतों. असें

ब्राह्मण चंद्रशेखर याचें वचन ऐकून राजा भद्रबाहु समाधान पावला परंतु तुम्ही परिहारार्थ जावें असें बोलवेना. कारण कीं आपली सेना व प्रजा आपले समक्ष दग्ध जाहाली, हाहि ब्राह्मण माझे वचनें जाऊन दग्ध जाहाल्यास पातक मात्र येईल. व निषेध केल्यास ब्राह्मणपरिहार करितां राजानें प्रजा मारविल्या हाही अभिशाप येईल असें ध्यानांत आणून मौनेंकरून उगाच राहिला. उपरांत चंद्रशेखरशर्मा ब्राह्मण हस्ताठाईं कालकूट गजकेसरी या नामें सिद्ध उटीका घेऊन सांबसदाशिवाचें स्मरण करून वासुकीचे सन्मुख गेला. उटिकेचे प्रभावें करून विषाचा उपद्रव तिलमात्र जाहाला नाहीं. मग समीप जाऊन वासुकीस साष्टांग नमस्कार करून प्रार्थनापूर्वक बोलता जाला कीं, तूं सदाशिवाचें कंठभूषण वासुकी हें मजला समजलें. त्यास हा राजा परम धार्मिक, प्रजापालनतत्पर आणि तूं समर्थाचा सेवक असें असतां या निरपराधी नगरीस उपद्रव न करावा. प्रज्याचा बहुत नाश जाहाला व पुढें हि होतच आहे; त्या अर्थी आतां क्षमा करावी हें तुजला योग्य आहे. हें वचन चंद्रशेखर याचें श्रवण करून वासुकी क्रोधयुक्त जाहाला आणि संपूर्ण नगर विषें करून जळालें असतां यास कांहीं उपद्रव न जाहाला म्हणून सभयहि जाहाला. मग जातीस्वभावास्तव व श्रीसदाशिवाची आज्ञा तिचे बळें करून चंद्रशेखर बोलिला त्याचा अनादर करून विषाच्या ज्वाळा ब्राह्मणावर टाकूं लागला. नंतर ब्राम्हणानें तीन वेळ प्रार्थना केली. तथापि शांत न होय. तेव्हां श्रीमृत्युंजयाचें स्मरण करून खेचरी विद्येचें अनुसंधान ध्यानांत आणून वासुकीचे पुछास हात घातला. तो वासुकी परम क्रोधायमान होऊन माघारा चंद्रशेखराकडे मुरडला. उपरांत ब्राह्मण पुछास धरून अंतरिक्षगतीनें निघाला. पाठीमागून वासुकी अधोमुख चालिला. हे नगरीचे लोकांनीं पाहून संतोष पावले. आणि चंद्रशेखर याची स्तुति करूं लागले. ब्राह्मणाचें मंत्रविद्येचें सामर्थ्य अलौकिक व प्रज्याचा उपद्रव शांत केला म्हणून ब्राह्मणावर आकाशांतून पुष्पवृष्टि देवांनीं केली. मग चंद्रशेखर कैलासास जाऊन श्रीसांब जेथें बसले होते त्यांस साष्टांगनमस्कार करिता जाहाला. आणि तो वासुकी कुबेराचे गळ्यांत घालावयास चालिला. कारण कीं याणें हा अनर्थ करविला त्या अर्थी याचे शासन करावें, हें पूर्व वर्तमान चंद्रशेखरास ज्ञानें करून समजलें, उपरांत ब्राह्मण क्रोधें करून तप्त जाहाला हे पाहून कुबेर भयभीत होऊन शिवास शरण गेला. नंतर सदाशिव मध्यस्थ होऊन ब्राह्मणाचें समाधान करून वासुकी आपले हातीं घेऊन आणि ब्राह्मण आपले समीप बसविला. मग चंद्रशेखर ब्राह्मण यानें स्तुति केली कीं ईश्वरा तूं धन्य आहेस, तूं ज्या पदार्थास थोरपणा देशील तो त्रिभुवनांत धन्य होईल. आम्ही ब्राह्मण आमचें सामर्थ्य काय ! परंतु तूं आदर करितोस तेणें करून सर्व विद्या सफल आहेत. ऐसी स्तुति करुन विज्ञापना केली कीं माहाराज आपण विनोद करुन कुबेरास उन्माद जाहाला होता तो दूर केला. पण त्या नगरींत बहुत कुटुंबांचा नाश जाला याला उपाय योजावा. मग सदाशिवानें मान्य करुन आपलें लावावयाचें भस्म चंद्रशेखर यास देऊन सांगितलें कीं, हें उदकांत घालून जळाले आहेत

तेथें टाकावें म्हणजे यथापूर्व होईल, मग ब्राम्हणानें तें भस्म व आज्ञा घेऊन विबुधपुरीस आला. तोंपर्यंत सर्व नगरवासी चिंताग्रस्त होते. यास पाहून आनंदयुक्त जाहाले. नंतर चंद्रशेखर तें भस्म उदकांत घालून प्रोक्षण करितांच नगरांत यथापूर्व जाहालें. कैलासास जाहाला वृत्तांत तो सर्वांस कळविला. मग राजाभद्रबाहु ब्राम्हणास साष्टांग नमस्कार करून प्रार्थना करिता जाहला कीं, महाराज मी राजा असतां माझ्यानें प्रजारक्षण जाहालें नाहीं आणि मजसहीत सर्व लोकांस प्राणदान केलें त्यास या राज्याचा अधिकार मजकडे कांहीं नाहीं. राज्य आपलें; मी माझें कुटुंब आपलें घरीं स्वामसेवा करून राहूं. राज्य आपण आटोपावें. मग चंद्रशेखर बोलिला कीं, राजाभद्र तुझे छायेखालीं आजपर्यंत आम्ही निर्भय राहून स्वधर्माचरण करितों. असें असतां या समईं हें कार्य केलें म्हणून तूं सारें राज्य आम्हांस देणार त्या अर्थी आमचे आज्ञेनें राज्य तूं करावें. प्रजापालन यथान्यायें करावें; येणेंकरून आमची सेवा होईल. असें सांगून चंद्रशेखर आपले आश्रमास येता जाहला. ही कथा सांगून चातुर्यलतिका म्हणाली कीं गुणसागरा हा विद्येचा प्रताप आहे यास्तव विद्याभ्यास करावा आणि लीनता धरावी. नंतर राजपुत्रानें विद्याभ्यास करावयाचें नियम करून आंगिकारिलें. कथा २

कथेचा सारांश—

### आर्या

सिध्यति यद् दुःसाध्यं सद्विद्यालंबनाञ्च तत्कनकात् ॥
क्कासौ वासुकिहृतभूपः क्कासौ चन्द्रशेखरो विप्रः ॥

तस्मात् तुला उचीत तें सांगतें हें सारिकावचन.

**वैदिक इंडिआ**—लेखक श्री. ना. भ. पावगी, किं. रु. ४ इंग्रजींत.

तारुण्यांत फुलणारा उत्कृष्ट देशाभिमान वार्धक्यांत कोमेजून जातो. पण नाना-साहेब पावग्यांच्या वयोमानाबरोबर त्यांच्या देशाभिमानाची उत्कटता अधिकच उत्कट होत आहे याचें बीज त्यांच्या मनोभूमिकेंत आहे. इंग्लिशांच्या सुधारणांचा टेंभा फोल आहे असें ग्रंथकाराचें झालेलें मत अयथार्थ आहे असें कोण म्हणेल ? प्रातिनिधिक संस्था प्रथमतः वैदिक आर्यांनींच काढल्या. त्याबद्दल इंग्लंड मारीत असलेली फुशारकी अवास्तव आहे असें ग्रंथकारांनीं या पुस्तकांत अनेक उतारे देऊन सिद्ध केलें आहे. त्याचप्रमाणें लपंडावी, तोंडचलाखी आणि स्वार्थपरायणता यांचें भरपूर माप इंग्रजी मुत्सद्यांच्या पदरांत घालून इंग्लिश व वैदिक आर्य यांच्या मनोरचनेंतील भेद व्यक्त करून दाखविला आहे. हेंच या ग्रंथाचें वैशिष्ठ्य आहे. नवीन अभ्यासकांस नाना-साहेबांनीं संकलित केलेलीं अवतरणें उपयुक्त झाल्याविना राहणार नाहींत. पुस्तकाची किंमत थोडी जास्त वाटते.

**पुरुषार्थशतक**—कवी, केशव लक्ष्मण टेंभुर्णीकर, संगमनेर, किं. ३ आणे.
हें कवितार्शतक अत्यंत निर्मळ असून मुलांमुलींना वाचण्यास योग्य आहे.

**लोककथा पुस्तक २**—संग्राहक, शंकर गणेश दाते, यांत १३ गोष्टी, शिवाय घरगाणीं, बाळ खेळ, म्हणी यांचा संग्रह केला आहे. पहिल्या पुस्तकानंतर दुसरें पुस्तक लवकरच प्रसिद्ध झालें याचा आम्हांस आनंद वाटतो. एकंदर १२ पुस्तकें प्रसिद्ध करण्याइतका संग्रह रा. दाते यांनीं केला आहे. यावरून त्यांच्या उद्योगशीलतेची कल्पना येईल. ब्राह्मणेतर जातींतील कथांकडे सुद्धां रा. दाते यांनीं लक्ष्य द्यावें अशी आमची त्यांस सूचना आहे.

**हिंदु-संघटना**—अभिनव ग्रंथमाला. पुष्प ९ वें. किं. १ रुपया.

मूळ पुस्तक स्वामी श्रद्धानंद यांनीं इंग्रजींत लिहिलें असून त्याचा हा अनुवाद मराठींत रा. विनायक गंगाधर लेले यांनीं केला आहे. या पुस्तकांत स्वामींनीं हिंदूंना मुसलमान व ख्रिस्ती यांनीं जुलमानें व लबाडीनें कसें बाटवलें त्याचें साधार वर्णन केलें आहे. श्री. लेले यांनीं मुळांतला चटकदारपणा मराठींतहि साधला आहे. प्रत्येक हिंदूनें हें पुस्तक वाचल्याशिवाय मरतां कामा नये इतक्या योग्यतेचें तें आहे. पण असलीं पुस्तकें मालेंत ओवणें चांगलें नाहीं. त्यांचा स्वतंत्रपणा रहात नाहीं. अशा पुस्तकांची बांधणी व छपाई सुंदर असावी.

### परीक्षण

## वासुदेवशास्त्री खरे यांचें चरित्र

**( परीक्षकः– ना. गो. चापेकर )**

वासुदेवशास्त्री यांच्या निधनानंतर अल्पावधींतच त्यांचें चरित्र लिहून प्रसिद्ध होण्याचा योग आला हें या पालटलेल्या कालाचें निःसंशय द्योतक होय. आजपर्यंत होऊन गेलेल्या कितीतरी नामांकित माणसांना कोणी चरित्रकार न लाभल्यामुळें त्यांचीं नांवेंहि स्मृतिपथांतून नष्ट होत चाललीं आहेत. गोपाळराव गोखल्यांचें चरित्र अद्यापि लिहिलें गेलें नाहीं याचें स्मरण करून दिलें पाहिजे असें नाहीं. गोखले हे अगदीं वरच्या "गोलां"त वावरणारे होते. पण त्या गोलांतील रहिवाश्यांस गोखल्यांच्या चरित्राचें महत्त्व पटलेलें दिसत नाहीं. यावरून खालच्या गोलांतील लोकांनीं या बाबतींत दाखवलेली सरशी अभिनंदनीयच म्हटली पाहिजे. "दूरीकृताः खलु उद्यानलता वनलताभिः" असें कालिदासाच्या शब्दांनीं म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. गोखल्यांचे गुरु माधवराव रानडे यांचें चरित्रहि एका पृथ्वीवरच्या माणसानेंच लिहिलें. असो. जेथें गोखल्यांची ही स्थिति तेथें जिनसीवाले, गणेश व्यंकटेश जोशी, शंकर पांडुरंग पंडित इत्यादि अनेक कर्त्या पुरुषांना लोक विसरले यांत आश्चर्य नाहीं. म्हणून वासुदेवशास्त्री खरे यांचें चरित्र लिहून महाराष्ट्रीयांना सादर केल्याबद्दल आम्ही रा. दा.-मो. भट यांचें मनापासून अभिनंदन करतों.

खरेशास्त्री यांचें चरित्र अनेक कारणांनीं बोधप्रद आहे. शास्त्रीबोवा हे इतिहास-संशोधक, कवि व नाटककार असे सव्यसाची होते. दुसऱ्या कोणत्याहि संशोधकावर काव्यदेवी प्रसन्न झाल्याचें दिसत नाहीं. तसेंच शास्त्रीबोवांना इंग्रजी शिक्षण पद्धतशीर रीतीनें मिळालेलें नव्हतें. ब्रिटिश अमदानीच्या आरंभीं शास्त्रीच पुढें आले, आणि तसें होणें त्यावेळीं स्वाभाविक होतें. पण तो काल गेला, शास्त्र्यांची परंपरा तुटली. आतां कालेजच्या आवाराच्या बाहेर शास्त्री क्वचित् दृष्टीस पडतो. पहिल्या पिढींतल्या शास्त्र्यांनीं मराठी भाषेसंबंधानें संस्मरणीय कामगिरी केली आहे. शास्त्रीचरित्रमाला काढून त्यांत सर्व शास्त्रीसाहित्यसेवकांचीं चरित्रें गुंफण्याचें कोणी मनावर घेतल्यास त्यानें एक मोठें कार्य केलें असें होईल. संशोधनाच्या कामीं अवश्य असणारी बुद्धीची सूक्ष्मता व कांटेतोलपणा हे गुण वासुदेवशास्त्र्यांसारख्या इंग्रजी शिक्षण न मिळालेल्या माणसांत कसे आले हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. इंग्रजी परीक्षांच्या चरकांत शास्त्रीबोवा सापडले असते तर त्यांच्या हातून त्यांनीं केलें तें कार्य झालें असतें काय असाहि प्रश्न कोणी विचारल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. इतिहाससंशोधनांत राजवाड्यांचा पहिला नंबर तर खरेशास्त्र्यांचा दुसरा लागेल.

शास्त्रीबोवांची काव्यरचना मोरोपंती थाटाची असून पंतांच्या कवितेप्रमाणेंच त्यांची कविता धीर, गंभीर अशी आहे. जुने शास्त्री बहुधा थट्टेखोर, शृंगारप्रिय, विनोदी, कोटीबाज

असे असावयाचे. वासुदेव शास्त्री याला अपवाद नव्हते. विशेषतः वेदांताचा अभ्यास ज्यांनीं केला नाहीं अशांमध्यें वरील गुण प्रामुख्यानें आढळत. असें असून शास्त्रीबोवांच्या नाट्यकथानकांत वीररसोत्पादक अशींच युद्धाचीं वर्णनें आढळतात. त्यांच्या कथानकांत विषयीजनांच्या ऐवजीं राजे, योद्धे, वीर यांचाच भरणा असतो. विषय हा कर्तृत्वशक्तीच्या अंगभूत त्यांनीं केला. इतिहाससंशोधनाचा हा परिणाम असावा. स्त्रिया सुशिक्षित असाव्या असेंच शास्त्रीबोवांस वाटत होतें. पण त्यांच्या शिक्षणाचे परिणाम कशांत झाले पाहिजेत याविषयीं त्यांनीं खालील श्लोकांत आपले विचार प्रकट केले आहेत.

कीं नम्रता, चतुरता, मधुरत्व वाचे
धैर्य, स्थिरत्व, असती गुण शिक्षणाचे
ते प्राप्त होति जरि सद्गुण बायकांतें
प्रत्येक होइल सुखी न कुटुंब कां तें !

एकंदरींत शास्त्रीबोवांचीं काव्यशक्ति वरिष्ठ प्रतीची होती यांत शंका नाहीं. त्यांचीं नाटकें मर्दानी आहेत आणि संशोधन मार्मिक आहे. असें कसदार वाङ्मय त्यांनीं निर्माण केलें. विश्वामित्राचे वंशज खरे !

खरे हे मूळचे चित्पावन नसून द्राविड म्हणजे देशस्थ होते ही नवीन गोष्ट रा. भटांच्या परिश्रमानें लोकांच्या निदर्शनास आली. वासुदेवशास्त्रयांची मुखचर्या या गोष्टीची साक्ष पटवण्यासारखी होती. आम्हांला वाटतें बरेचसे खरे शास्त्रीबुवांच्या वळणाचेच असावे. हें देशस्थी घराणें चित्पावनांत बिनहरकत कसें सामावून गेलें याचा उलगडा चरित्रकारांनीं केला नाहीं. खरे आडनांवाच्या कोणत्याहि कुटुंबाचें गोत्र कौशिक खेरीज करून दुसरें नाहीं. व यांचें मूलस्थान गुहागर हेंच एकटें असावें. वेळणेश्वराचे खरे मूळचे गुहागरचे नसतील ना ? कोणत्याहि खरे घराण्यांत त्याचा द्राविडी उगम दाखविणारा आचार कसा राहिला नाहीं याचें आश्चर्य वाटतें. वंशपरंपरागत दंतकथा ही एकटीच हा द्राविडी वंश असल्याचें सिद्ध करण्यास, पुढें आली आहे. देशावरून कऱ्हाडे कोकणांत आले. तथापि ते चित्पावनांत सामील झाले नाहींत. हल्लींच्या मन्वंतरापूर्वी त्यांचा शरीरसंबंध देशस्थांशीं होई. याप्रमाणें कऱ्हाडच्या देशस्थांनीं पण कोकणच्या कऱ्हाड्यांनीं आपला देशस्थीपणा कायम राखला. कोकणांत ठिकठिकाणीं वतनदार देशस्थ कुटुंबें आहेत. पण त्यांनींहि आपणांस चित्पावनांत सामील करून घेतलें नाहीं. मग हें खऱ्यांचें घराणें बिनबोभाट चित्पावन कसें बनलें ? खरे घराण्याचा इतिहास लिहिण्यास एखादा खरे कां बरें पुढें येऊं नये ? खऱ्यांना द्राविड ठरविणारें शंकराचार्यांचें आज्ञापत्र मिळविण्याची खटपट रा. भट यांनीं करावयास पाहिजे होती. कौशिक उपनांवाचीं कुटुंबें चित्पावनांत पुष्कळ आहेत. खरे हे अस्सल देशस्थ असल्यास त्यांचें पूर्वीचें गोत्र हि कौशिक होतें कीं काय याचा विचार व्हावयास पाहिजे. रघुनाथशास्त्री पटवर्धन यांच्या पंचांगांत कोकणस्थांचीं आडनांवे एकंदर ३४१ दिलीं आहेत. त्यावरून कोणत्या गोत्राचीं कितीं कुटुंबें आहेत याचे आंकडे येणें प्रमाणें

| | | | |
|---|---|---|---|
| शांडिल्य | ६४ | वासिष्ठ | ५० |
| काश्यप | ४७ | कौशिक | ३९ |
| गार्ग्य | ३३ | कपि | २६ |
| भारद्वाज | २० | वत्स | १८ |
| अत्रि | १४ | विष्णुवर्धन | ९ |
| नित्युंदन | ८ | कौंडिण्य | ७ |
| जामदग्न्य | ४ | बाभ्रव्य | २ |
| | | | ३४१ |

१४ गोत्रांपैकीं ७ गोत्रांचीं कुटुंबें संख्येनें इतकीं कमी कां असावीं समजत नाहीं. बाभ्रव्य गोत्राची तर बाळ आणि वेहरे या दोन उपनांवाचींच कुटुंबें आहेत. या कुटुंबांची मनुष्यसंख्या फार असेल असेंहि वाटत नाहीं. पण हा विषय येथेंच सोडणें प्राप्त आहे. पंचांगांत अनेक उपनांवें दिलीं आहेत तीं घोटाळा उत्पन्न करतात. मूळनांव देऊन कंसांत कारण-परत्वें पडलेलें आडनांव देण्याची वहिवाट ठेवल्यास बरें. उ. लिमये ( खासगीवाले ) असें असावें.

असो. मुख्य गोष्ट सांगावयाची ती ही कीं खरे हे देशस्थाचे कोकणस्थ कसे झाले या विषयीं थोडा अधिक विस्तार चरित्रकारांनीं करावयास पाहिजे होता असें आम्हांस वाटतें.

गोविंद शंकर शास्त्री बापट पुळ्याच्या गणपतीचे असल्यामुळें त्यांची व वासुदेव शास्त्रयांची ओळख असावी. गोविंद शंकर शास्त्री हे कवी होते असें आम्हांस वाटत नाहीं. ते वक्ते तर नव्हतेच. ते उत्तम गद्य लेखक होते. मग वासुदेवशास्त्रयांनीं बापटशास्त्रयांच्या अभिनंदनार्थ लिहीलेल्या कविताबद्ध पत्रांत त्यांच्या कवित्वाचा उल्लेख कां करावा तें कोडेंच आहे. रा. भट यांनीं त्याचा उलगडा केला नाहीं. खरोखर गोविंद शंकर शास्त्रयांची माहिती त्यांनीं थोडीशी तरी या चरित्रांत द्यावयास पाहिजे होती. पण त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्न केलेला दिसत नाहीं.

एकंदरींत रा. भट यांनीं खरेशास्त्रयांचें चरित्र फार परिश्रम करून लिहिलें आहे. तरी सुद्धां आणखी परिश्रम करावयास पाहिजे होते असेंच आम्हांला वाटतें. या चरित्रांत ठिकठिकाणीं "असें म्हणतात" "असें वाटतें" इत्यादि शब्दप्रयोगांवरूनच वरील विधान सिद्ध करतां येईल. पण याचा अर्थ रा. भट यांनीं अपूर्ण अथवा दोषयुक्त चरित्र लिहिलें असा मात्र नाहीं. रा. भट यांचा हा पहिलाच प्रयत्न असावा. तो उत्तम साधला आहे यांत तिळमात्र संशय नाहीं. ज्याच्याजवळ भांडवल असतें त्याच्यावरच अधिक मागण्या करण्यांत येतात.

आमची अशी खोडच आहे कीं आपला चरित्रनायक सर्वश्रेष्ठ आहे असें समजून चरित्रांत कमालीचीं विशेषणें सर्वत्र पेरून ठेवावयाचीं. याला श्री. न. चिं. केळकर व न. र. फाटक हे दोनच अपवाद दिसतात. मृतमाणसाबद्दल अनादराचा भासहि होऊं नये म्हणून परीक्षण करणारे या दोषाची वाच्यता करीत नाहींत. या दोषाचें दुसरें स्वरूप म्हणजे चरित्रनायकाचे स्वभावदोष असतील त्यांनाहि गुणांचा मुलामा द्यावयाचा. चरित्रलेखक हा चरित्र नायकाशीं सहानुभूत असलाच पाहिजे; पण शिवाय न्यायाधीशाचेंहि काम करण्याइतकी त्याची बुद्धि स्वच्छ पाहिजे. वासुदेव शास्त्री खरे यांच्या देहाप्रमाणेंच त्यांचें चरित्र भव्य व उठावदार आहे. त्यामुळें रा. भट यांचें वैगुण्य तितकें भासत नाहीं. या पुस्तकानें मराठी वाङ्मयाला चांगलेंच लेणें मिळालें यांत शंका नाहीं. पुस्तक संग्राह्य व वाचनीय आहे.

# अभिप्राय

The Deliverance or the Escape of Shivajee the great from Agra. By. Raosahib G. K. Deshpande; price paper bound Rs. 3, cloth-bound Rs. 4.

शिवाजीच्या आयुष्यांतला एक अद्‌भूत प्रसंग म्हटला म्हणजे त्याची आग्र्याहून सुटका हा होय. औरंगझेबाच्या कचाटांतून शिवाजीनें ज्या उपायानें आपली सुटका करून घेतली त्याला जगाच्या इतिहासांत तोड मिळणार नाहीं. आमच्याकडे जर खरे कादंबरीकार किंवा कवी असते तर या प्रसंगाला धरून कादंबऱ्यांचा व काव्यांचा ढीग पडला असता. पण कवींना स्फूर्ति पश्चिमेकडूनच मिळते. असो. आग्र्याहून शिवाजीनें आपली सुटका करून घेतली त्यासंबंधाची सर्व हकीकत अनेक प्रकारच्या अस्सल पुराव्यानिशीं रावसाहेब देशपांडे यांनीं चित्ताकर्षक भाषेंत वर्णन केली आहे. शिवाजी अगोदर आग्र्यास गेला कां, तेथें गेल्यावर औरंगजेबाच्या दरबारांत खरोखर काय प्रकार घडला यांविषयीं निरनिराळी हकीकत इतिहासकारांनीं लिहून ठेवली आहे. या वृत्तांताचें संशोधन होऊन खरी हकीकत निश्चित करणें अगत्याचें आहे. आमच्या मतें—आणि ग्रंथकारांचेंहि तेंच मत— औरंगझेबास भेटण्यास जाण्याचा शिवाजीचा हेतू मोंगली दरबारच्या खर्चानें स्वराज्य स्थापन करण्याचा असावा. मुख्य सेनापति म्हणून बादशाहानें शिवाजीची नेमणूक केली असती म्हणजे हें सहज घडून आलें असतें. निदान दक्षिणेंतील मुसलमानी राज्यें परस्पर धुळीस मिळवतां आलीं असती. पण खऱ्या मराठी गड्याला अत्यंत अपमानास्पद वाटणारी कुरनीस यथाविधि न झाल्यामुळें प्रथमग्रासे मक्षिकापातः या न्यायानें पुढें सर्वच मुसळ केरांत असा प्रकार झाला. महाराष्ट्रियांच्या अभिमानाची साक्ष अजूनहि पटण्यासारखी आहे. त्यानंतर औरंगझेबाच्या तडाक्यांत शिवाजी सापडला. त्यांतून निसटण्याची अजब युक्ति शिवाजीला म्हणूनच साधली. परकी राज्यांत गुप्त पोलीस खात्यांत नोकरी करणारांतहि देशाभिमान जागृत राहूं शकतो ही अशक्यप्राय वाटणारी गोष्ट बाबासाहेबांनीं सिद्ध करून दाखविली आहे. कारण या पुस्तकांत शब्दागणतीं रसरशीत अभिमान दिसून येतो. पुस्तक आरंभापासून अखेरपर्यंत वाचनीय झाले आहे. प्रो. भानूंची प्रस्तावना उद्बोधक आहे.

परिषद्वार्ता

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

( लेखकः—के. ल. ओगले )

## दोन वर्षांच्या कामाचा आढावा.

### (१) पत्रिकेचें स्वरूप

चैत्र शुद्ध १ शके १८५० म्हणजे इंग्रजी तारीख २२ मार्च १९२८ या दिवशीं प्रस्तुत पत्रिकेला नव्या योजनेनुसार आरंभ होऊन तिचा पहिला अंक प्रसिद्ध झाला. विविधज्ञानविस्ताराचा एक भाग म्हणून जेव्हां पत्रिका प्रसिद्ध होत होती, तेव्हां तिचा आकार अगदीं लहान असल्यामुळें तिच्या स्वरूपाच्या मागें विशेष निश्चित योजना नसणें स्वाभाविक होतें. पण स्वतंत्र त्रैमासिकरूपानें ती काढावयाचें महाराष्ट्र-साहित्य-परिषदेनें ठरविल्यावर तिच्या स्वरूपाची व व्यापाची योजना करणें अवश्य झालें व तदनुसार परिषदेनें एक योजना करून महाराष्ट्रांतील विद्वानांकडे माहितीसाठीं ती पाठविली व पुष्कळांशीं तोंडी खल करून व कित्येकांचे लेखी अभिप्राय घेऊन तिचें स्वरूप कार्याध्यक्ष व संपादक रा. रा. ना. गो. चापेकर यांनीं निश्चित केलें व वर सांगितल्याप्रमाणें पहिला अंक प्रसिद्ध केला. पत्रिकेचें स्वरूप करमणुकीचें नाहीं; तर भाषाशास्त्र, ग्रंथचिकित्सा, इत्यादि विषयांची शास्त्रीय चर्चा करणें व त्या चर्चेचीं साधनें उपलब्ध करून देणें हें तिचें मुख्य ध्येय होय. या ध्येयाला साक्षात् वा परंपरया ज्या विषयांचें साह्य होईल त्या सर्व विषयांचा परामर्श पत्रिकेनें घ्यावयाचा आहे. अर्थात् व्याकरण, व्युत्पत्ति, वाक्यमीमांसा, ग्रंथपरीक्षण, शब्दचिकित्सा, शब्दसंग्रह, परकीय भाषांशीं तुलना, लौकिक कथासंग्रह, हे विषय पत्रिकेंत आले पाहिजेत. पण कोणत्याहि विषयावरील संशोधनात्मक लेखांचें, कवि व ग्रंथकार यांच्या चरित्रांचें, तसेंच इतरहि कित्येक गोष्टींचें साहित्यशास्त्राला परंपरया साह्य होत असल्यामुळें त्यांनाहि पत्रिकेंत स्थान मिळालें पाहिजे.

### (२) आठ अंकांतील विषयांची वर्गवारी

पत्रिकेच्या पहिल्या अंकांत आरंभीं तिच्या स्वरूपाची रूपरेखा दिली असून तिचें जें तात्पर्य वर सांगितलें आहे, त्याला अनुसरून पत्रिकेच्या आजवर प्रसिद्ध झालेल्या आठ अंकांतील विषयांची निवड शक्य तों केलेली आढळून येईल. शक्य तों म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, एखाद्या लेखासंबंधानें कोणाचा मतभेद होण्याचा संभव आहे. या अंकांत आलेल्या लेखांपैकीं (१) मुंबई सरकाराचें येत्या सालचें अंदाजपत्रक, (२) अलीबहादर यास पाठविलेलीं पत्रें. (३) डॉ. सन्यत्सेन काय म्हणतो. (३) अलीबहादर यास उत्तर, (५) हकीकत तर्फ नातें तालुके रायगड, (६) ऐतिहासिक पत्रें (७) शालिवाहन शक, इत्यादि विषयांचा साहित्यशास्त्राशीं साक्षात्संबंध नाहीं. पण ऐतिहासिक विषयांचा भाषाशास्त्राशीं अप्रत्यक्षसंबंध आहे हें मान्य करण्यास फारशी अडचण पडणार नाहीं. शिवाय साहित्यपत्रिकेचें ध्येय भाषेची सर्वांगीण वृद्धि करणें हाच

असल्यामुळें वर उल्लिखित केलेल्या बहुतेक विषयांचा परामर्श घेणें साहित्यपत्रिकेला अवश्यच आहे. काव्य मात्र या आठ अंकांत अद्यापि आलें नाहीं. पत्रिकेंतील विषय दुसऱ्या अंकापासून विशिष्ट मथळ्यांखालीं गट करून दिले आहेत, त्यांवरुन त्यांचें वर्गीकरण (१) स्वतंत्र निबंध, (२) ऐतिहासिक माहिती, (३) सामाजिक गोष्टींचा संग्रह व चर्चा, (४) भाषाविषयक माहितीचा संग्रह व चर्चा, (५) परिषदा, संमेलनें इत्यादिकांची माहिती, (६) पुस्तकपरीक्षण, (७) स्वतंत्रग्रंथप्रकाशन, (८) चरित्र, (९) शंका, समाधान असें केलें असतां हरकत नाहीं. पहिल्या वर्षाच्या चवथ्या अंकांत विषयांची व लेखकांची नामावली दिली आहे, तींत अर्थशास्त्र, परभाषेंतील ग्रंथ व सार-संग्रह हे वर्ग अधिक आढळतील, पण त्यांचा अन्तर्भाव स्वतंत्र निबंध या विषयांत करतां येण्यासारखा आहे.

## (३) विषयांचें दिग्दर्शन

स्वतंत्र निबंध या वर्गांत अनेक विषयांवर निबंध आले आहेत. अर्थशास्त्र, शारीरविज्ञान, इतिहास, राजकारण, भूस्तरशास्त्र, कृषिशास्त्र, परभाषांतील वाङ्मय असे ते विषय असून कै. रा. सा. वझे, कै. प्रो. भानु, श्री. वाकसकर, मोडक, कै. बाळकृष्ण अनंत भिडे इत्यादि स्वतंत्र बुद्धीच्या संशोधकांच्या हातून ते लिहिले गेले आहेत. रा. सा. वझे भारतीय प्राचीन वाङ्मयांतून भौतिकशास्त्रांची परिभाषा व त्यांतील सिद्धांत हुडकून काढण्याचें महत्वाचें कार्य करीत होते व त्यांची दृष्टि सयुक्तिक अभिमानाची असल्यामुळें त्यांचें लिखाण फार महत्वाचें उतरत असे. भौतिक शास्त्रविषयक परिभाषा निश्चित करण्याच्या कामीं त्यांचें संशोधनकार्य अत्यंत उपयोगी पडणारें असून त्यांच्या मृत्यूमुळें या बाबतींत मोठी हानि झाली आहे. त्याचप्रमाणें प्रो. भानूंचा ज्ञानतंतुव्यूह हा लेख आतां अपुरा रहाणार ही देखील खेदाची गोष्ट होय. असो. निबंध या वर्गांतील गुजरात—एक सांस्कारिक व्यक्ती हा श्री. वाकसकरांचा अनुवादात्मक लेख देशी भाषांच्या अभिवृद्धीचा तौलनिक इतिहास पहाणारास विशेष मनोरंजक वाटेल. चरित्र व इतिहास या वर्गांतील कै. विनायकराव ओक व कै. इतिहासाचार्य राजवाडे यांविषयींचे लेख आले आहेत. सामाजिक गोष्टींच्या वर्गांत अनेक प्रकारच्या चालीरीतींचा समावेश झालेला आढळून येईल. प्रस्तुत परिस्थिति इतक्या झपाट्यानें बदलत आहे कीं, ही माहिती पांढऱ्यावर काळी होऊन राहिली तरच पुढील पिढीला ती समजणार आहे. परंपरेच्या द्वारा ती टिकून रहाणें बहुधा अशक्य दिसतें. निरनिराळ्या कल्पनांचा प्रादुर्भाव होऊन ज्या चालीरीती बनत असतात, त्यांत कांहीं पद्धत असली पाहिजे. अशा दृष्टीनें त्या चालीरीतींची चिकित्सा करून तीवरून समाजशास्त्रविषयक सिद्धांत बांधतां येण्यापूर्वीं त्या चालीरीती स्पष्टपणें नमूद होणें जरूर आहे. भाषाविषयक लेखांत मराठी भाषेच्या घटनेचें ऐतिहासिक स्वरूप समजावें अशा प्रकारची बरीच माहिती संकलित केलेली असून, तिच्या प्रस्तुत व्याकरणाचीहि चर्चा चालू झालेली आहे. या दृष्टीनें रा. कानिटकर, व ननद्दी यांच्या लेखांकडे लक्ष

पुरविण्यासारखें आहे. स्वतंत्रग्रंथ या वर्गांत भाण्डीरभाषा व्याकरण, निरुक्ताचें भाषान्तर हीं आलीं असून निरुक्ताचें कोणत्याहि भाषेंतील भाषान्तर असें हेंच प्रसिद्ध होत आहे. निरुक्तग्रंथाचें महत्त्व तौलनिक भाषाशास्त्रांत किती आहे हें प्रसिद्ध आहे. वाक्यार्थमीमांसेच्या दृष्टीनें पूर्वमीमांसादर्शनाचें जें महत्त्व तेंच शब्दमीमांसेच्या दृष्टीनें निरुक्ताचें होय. पुस्तकपरीक्षणांत अभिप्राय या मथळ्याखालीं किरकोळ पुस्तकांचा परामर्श घेतलेला असून कौटिलीय अर्थशास्त्र, डॉ. भाण्डारकर यांचें चरित्र, प्रार्थना समाजाचा इतिहास, ऐतिहासिक पोवाडे, रामायणसमालोचना, रावसाहेब मंडलिकांचें चरित्र, आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष इत्यादि महत्वाच्या ग्रंथांचें परीक्षण सविस्तर आलें आहे. अलीकडे पुस्तकपरीक्षण ही बाब विशेष नाजूक झाली आहे. सामान्यतः ग्रंथाची भरपूर स्तुति व स्तुतीला दृष्ट लागूं नये म्हणून किरकोळ दोषचिकित्सा यांच्या पलीकडे जाऊन ग्रंथांत वर्णिलेल्या विषयाची, त्याच्या मांडणीची, भाषापद्धतीची, इत्यादि चिकित्सा करणें अब्रह्मण्य होण्याची वेळ आली आहे ही मोठया खेदाची गोष्ट होय. विद्यमान किंबहुना जवळच्या काळींहि होऊन गेलेल्या ग्रंथकारांच्या ग्रंथांचें परीक्षण करावें कीं करूं नये असाहि प्रश्न कित्येकांपुढें उभा रहातो. तात्पर्य ग्रंथपरीक्षण म्हणजे तारेवरील कसरत होऊं लागल्याचें दिसतें. पण ही स्थिति वाङ्मयाच्या प्रौढत्वाला मोठीशी पोषक आहे असें म्हणवत नाहीं. असो,

गेल्या दोन वर्षांत साहित्य पत्रिकेंत लहान मोठे असे उपरोक्त विविध विषयांवर १४० हून अधिक लेख असून ते अठ्ठेचाळीस लेखकांनीं लिहिले आहेत. या लेखकांतील वा. गो. आपटे, बा. अ. भिडे, चि. गं. भानु, कृ. वि. वझे, हे सुप्रसिद्ध विद्वान् लेखक दिवंगत झाल्यानें पत्रिकेची मोठी हानि झाली आहे. प्रो. राजवाडे नानासाहेब वैद्य, धुळ्याचे श्री. भट व देव, रा. दिवेकर, सरदार श्री. माधवराव किबे, श्री. ना. कृ. गद्रे, वे. शा. सं. रंगाचार्य रड्डी, श्री. वाकसकर, माधवराव मोडक, श्री. गो. कृ. मोडक रा. कानिटकर, इत्यादि लेखक कसलेले असून कित्येक नवीनहि तयार झाले आहेत. श्री. प्रल्हादपंत कानिटकर, श्री. बनहट्टी श्री. म. वि. डोंगरे, श्री. कापडी इत्यादि भाषाव्यासंगी नुकतेच आखाड्यांत उतरले असून त्यांच्या संबंधानें पत्रिकेला मोठी आकांक्षा बाळगतां येण्याजोगी आहे. श्री. नी. शं. नवरे, व श्री. कृ. गो साठे यांचाहि संग्रहाच्या दृष्टीनें निर्देश करणें अवश्य आहे. थोड्या बारकाईनें पत्रिकेच्या लेखकांचे निरीक्षण केल्यास रूपरेखेंत पत्रिकेच्या हेतुसिद्ध्यर्थ "लेखक वर्ग निर्माण करावा लागेल" असें जें म्हटलें होतें त्याचा प्रत्यय येऊन नवीन लेखक साहित्य-पत्रिकेसाठीं निर्माण झाल्याचेंहि दिसून येईल. आम्ही या सर्व जुन्या व नव्या लेखकांचें अभिनंदन करून आभार मानितों. पत्रिकेला मराठी नियत कालिकात साहित्यदृष्टीनें अग्रस्थान मिळवून देऊन तें टिकवण्याचा भार नव्या जुन्या लेखकवर्गावर आहे. यास्तव, भाषा प्रेमानें, स्वाभिमानानें व उद्योगप्रियतेनें अनेक साहित्यभक्त पुढें येतील व पत्रिकेचा परिपोष करोत अशी प्रार्थना करून हें अल्प निरीक्षण पुरें करितों.

# अभिप्राय

**वासंतीः—** (संपादक वि. स. सुखटणकर किं, १ रु.) शाळेंतील विद्यार्थ्यां-करतां रा. सुखटणकर यांनीं हा अर्वाचीन कवींच्या कवितेचा संग्रह केला आहे. निवड चांगली आहे. अर्वाचीन तेवढें हीनकशी हें जसें असत्य तसेंच जुनें तेवढें सर्व चांगलें हेंहि असत्य. चांगलें भूतकालांत असतें तसेंच भविष्यांतहि असतें. शिवाय आधुनिक विचारांच्या वाङ्मयाचा परिचय करून देणें हें नुसतें इष्ट नसून अवश्य आहे. या दृष्टीनें रा. सुखटणकर यांनीं मोठीच कामगिरी केली आहे. या संग्रहास श्री. प्र. के. अत्रे यांनीं प्रस्तावना लिहिली आहे ती फारच मार्मिक आहे.

**गोव्याचा माहितगारः—** (लेखक. नारायण भास्कर नाईक, किं. ६ आणे.) गॅझेटिअर प्रमाणें या पुस्तकांत रा. नाईक यांनीं गोव्यासंबंधी यच्चावत माहिती समाविष्ट करून पुस्तकाच्या उपयुक्ततेंत कमीपणा ठेवला नाहीं. किंमतहि माफक आहे. हें पुस्तक व रा. पै यांचें पुस्तक यांनीं गोव्यास जाणारांची मोठी सोय केली आहे.

**रुक्मिणीहरण-निरीक्षणः—** (ले. प्र. धों. कानिटकर) प्रो. तुळपुळे यांनीं प्रसिद्ध केलेल्या रुक्मिणीहरणाचें हें निरीक्षण श्री. कानिटकर यांनीं केलें आहे. या काव्यांतील शब्दांचे अर्थ निश्चित करण्याच्या कामीं त्यांनीं बरेच परिश्रम केलेले दिसतात. त्यांनीं सुचविलेले पाठभेदहि विचार करण्यासारखे आहेत. एम्. ए. च्या विद्यार्थ्यांना या निरीक्षणाचा फार उपयोग होईल.

**गोमंतकाची राज्यव्यवस्थाः—** (लेखक दत्तात्रय व्यंकटेश पै. किं. १२ आणे.) हें अत्यंत उपयुक्त पुस्तक लिहून प्रसिद्ध केल्याबद्दल रा. पै यांचें आम्ही अभिनंदन करतों. गोमांतकांतील विद्यार्थी या पुस्तकाचा भूगोलाप्रमाणें उपयोग करण्याचा संभव असला तरी गोमंतकाबाहेरील लोकांस सामान्य माहितीच्या दृष्टीनें या पुस्तकाची उपयुक्तता फार होण्यासारखी आहे. येत्या मे महिन्यांत गोव्यास भरणाऱ्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाकरतां गोमंतकाबाहेरील लोक जातील त्यांची रा. पै यांच्या पुस्तकानें मोठीच सोय होणार आहे. आमच्या या बाजूला प्रत्येक जिल्ह्याचें असें नमुनेदार पुस्तक होणें अवश्यक आहे. वस्तुतः ती कामगिरी राष्ट्रीय सभेच्या स्थानिक कमिट्यांनीं आपल्या शिरावर घेतली पाहिजे. अशा पुस्तकांचा खपहि पुष्कळ होईल व ग्रामसुधारणेला त्यापासून मदत होईल. गोमंतकांत जुन्या ग्रामसंस्था अद्यापि चालत आहेत हें वाचून आमच्याकडील पुष्कळ लोकांना आश्चर्य वाटेल. या संस्थांचें अधिक तपशीलवार स्वरूप जाणण्याची इच्छा वाचकांच्या मनांत रा. पै यांनीं उत्पन्न केली आहे. हिंदूकरणाच्या प्रयत्नामुळें खिस्त्यांची संख्या कमी होऊन हिंदूंची वाढली आहे ही फार समधानकारक स्थिति आहे. स्त्रियांना गोव्याची हवा मानवते असें वाटतें. कारण तेथील स्त्रियांच्या मरणाचें प्रमाण ब्रिटिश हद्दींतील स्त्रियांहून कमी असावें असें दिसतें. पुस्तक वाचनीय आहे.

परीक्षण

# हिंदी–सुमेरी संस्कृति

( लेखकः—ना. गो. चापेकर. )

सुमेरी संस्कृतीवर मराठींत पुस्तक नाहीं. त्यामुळें ग्रंथकार रा. दाजी नागेश आपटे यांच्या उपरिनिर्दिष्ट पुस्तकाचें स्वागत महाराष्ट्राकडून मोठ्या कुतूहलानें होणें स्वाभाविक होतें. विषय अत्यंत महत्त्वपूर्ण आणि ग्रंथकार एक सुप्रसिद्ध कसलेले लेखक या कारणांकरतां तर सदरहू पुस्तक वाचण्याची उत्सुकता साहजिकपणेंच प्रबल होते. आम्हीहि हें पुस्तक मोठ्या उत्सुकतेनें वाचावयास घेतलें. पण परीक्षण मात्र भीतभीतच करीत आहों. कारण आम्ही काय वाचलें हें आमचें आम्हांलाच समजल्याचें दिसत नाहीं.

आशियांतील तुर्कस्थानांत तैग्रीस आणि युफ्रेटीस या दोन नद्या आहेत. त्या इराणी आखाताला मिळतात. या नद्यांमधील प्रदेश अत्यंत सुपीक असून अनेक प्राचीन साम्राज्यांचा तेथें उदयास्त झाला आहे. या प्रदेशाचें अर्वाचीन नांव मेसापोटामिया असें असून तो ७०० मैल लांब व २०० मैल रुंद आहे. बगदाद शहराजवळ तैग्रीस व युफ्रेटीस या दोन नद्या अगदीं जवळ जवळ आल्यामुळें वरला व खालला असे दोन भाग मेसापोटेमियाचे निसर्गतःच पडले आहेत. वरल्या भागांत असीरिअन साम्राज्य उदय पावलें तर खालल्या भागांत बॅबिलोन व खाल्डिया हीं साम्राज्यें भरभराटीस आलीं. संस्कृति ही साम्राज्याची सहचरी आहे असें दिसतें. कारण साम्राज्यविरहित संस्कृति आणि संस्कृतिविरहित साम्राज्य असल्याचें आढळत नाहीं. मात्र या सिद्धांताला एक अपवाद आर्यांचाच दिसतो. साम्राज्यरूपी वृक्षाचा आश्रय करून राहण्याची अवश्यकता आर्यसंस्कृतीस वाटली नसावी. कारण आर्यांचें साम्राज्य असा शब्द-प्रयोगहि कानावर येत नाहीं. आर्यसंस्कृति म्हणण्यापेक्षां वैदिक संस्कृति हाच शब्दप्रयोग अधिक यथार्थ होईल. तेव्हां असें दिसतें कीं, वैदिक संस्कृति ही साम्राज्यांगभूत नाहीं. म्हणून जगांतील आजवर होऊन गेलेल्या संस्कृतींचें वैदिक व अवैदिक असे दोन भाग पाडणेंच सोयीचें होईल. आणि या दृष्टीनेंच या दोन संस्कृतींतील भिन्नता निरखून पाहिली पाहिजे. अ-वैदिक संस्कृतींना आसुरी संस्कृती असेंहि सामान्यतः म्हणतां येण्यासारखें आहे. अथवा निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे एक अध्यात्मिक आणि दुसरी आधिभौतिक संस्कृति होय. सर्व आसुरी संस्कृतींचें मूलगृह मेसापोटामिआ होय. या प्राचीन आसुरी संस्कृती पृथ्वीच्या पोटांत गडप झाल्या आहेत. पण राक्षसाच्या रक्तापासून जसे अनेक राक्षस उत्पन्न होतात त्याप्रमाणें एक आसुरी संस्कृति मरून त्यांतून दुसरी आसुरी संस्कृति जन्म पावते. वैदिक संस्कृतीची गोष्ट याहून निराळी आहे हें सांगावयास नकोच. आर्यसंस्कृति उत्खननानें शोधून काढावयाची नाहीं. निदान अद्यापि काढलेली नाहीं. कोणत्याहि समाजाची प्रगति हीच त्याची संस्कृति होय. आपल्या बुद्धिसामर्थ्यानें मनुष्य एक प्रकारची जड सृष्टि व विचार सृष्टि निर्माण

करतो. हेंच त्याचें सांस्कृतिक कर्म. जलाशय हा ईश्वरनिर्मित, पण त्यावरून चालणारी आगबोट ही मनुष्यनिर्मित. पर्वत निसर्गदत्त, परंतु बोगदा मनुष्यकृत. शंकराचार्यांचें अद्वैत प्रतिपादक तत्वज्ञान ही विचारसृष्टि मानवी बुद्धीचें फल होय. आकाशचुंबित वृक्ष ही जरी परमेश्वरी देणगी असली तरी गगनस्पर्शी घरें उभारण्याचें कौशल्य मानवी होय. आपण क्षणभर रानटी समाजांकडे पाहिलें तर प्राकृत आणि संस्कृत समाजांतला भेद आपल्या मनावर चांगला ठसेल. प्राकृत समाज निसर्गाच्या जवळ जवळ असतो, तर संस्कृत समाज निसर्गाला सोडून दूर अंतरावर गेलेला असतो. ज्या समाजाला घरें करून राहण्याचेंहि ठाऊक नाहीं त्याच्यासंबंधानें आगगाड्यांच्या आणि विमानांच्या गोष्टी कोण बोलणार ? प्राकृत समाजाचे देवहि पशु, पक्षी, वृक्ष इत्यादि निसर्गकृत प्राणी अथवा पदार्थ असतात. संस्कृत समाज आपला देव आपल्या प्रगल्भ कल्पनानुसार बनवतो. घरें करून राहण्यांत संस्कृतीचा प्रारंभ होतो. कारण घरांच्या अभावीं इतर कलांचा प्रादुर्भाव होण्यास योग्य संधि मिळत नाहीं. घर नसेल तर मातीचीं, तांब्या पितळेचीं भांडीं, मूर्ती कोठें ठेवणार ? वस्त्रांची निर्मिती आणि संचय कसा करणार ? उद्यानांना अवकाश कोठें राहणार ? अन्नपाकाची कला कशी साधणार ? अलंकारकौशल्य प्रकट कसें होणार ? वाहनांची कल्पना कोणाला सुचणार ? तात्पर्य घर हा सुधारणेचा पाया आहे. रानटी लोकांस घरेंच नसतात. त्यामुळें त्यांची संस्कृति थबकून राहते. उत्खननांत घरें सापडलींच पाहिजेत. घरांच्या पायीं इतर वस्तू आढळतात. लेखांच्या योगानें प्राचीन नष्टप्राय समाजांची विचारसृष्टि आपणांस ज्ञात होते तर गृहवस्त्वादिकांच्या योगानें त्यांच्या जडसृष्टीचें अनुमान करतां येतें. आजपर्यंतच्या शोधांत घरें, भांडीं, मूर्ति, लिपी हीं उघडकीस आलीं आहेत. तथापि चमत्कार हा कीं, अग्निकुंडें असलेलीं घरें अद्यापि कोणी जमिनींतून वर आणलीं नाहींत. किंवा वेद लिहिलेल्या विटा अजून कोणाच्या हातीं लागल्या नाहींत. असो. इतका प्रपंच करण्याचें कारण हेंच कीं वैदिक व सुमेरी संस्कृती एकरूप होत्या हें सिद्ध करण्याकरतां लिहिलेल्या पुस्तकांत वैदिक संस्कृतीचें स्वरूप कोणतें याविषयीं रा. आपटे यांनीं एक शब्दहि लिहिला नाहीं. प्रत्येक समाज सारख्याच पायऱ्यांवरुन गेलेला असतो. तेव्हां कित्येक कल्पना सर्व समाजांत सारख्याच आढळतात यांत नवल नाहीं. मुलांच्या गोष्टी, लोककथा, लोकगीतें यांतील विचार सर्वसाधारण असतात. पण बुद्धीचें कार्य म्हणून निरनिराळ्या समाजांची संस्कृति विशिष्ट रूप धारण करते. वैदिक संस्कृतीचें स्वरूप वाचकांना पटवल्याशिवाय ग्रंथकारांचा शोध त्यांच्या मनावर ठसण्यास अडचण पडेल असें आम्हांस वाटतें.

या पुस्तकांतील सिद्धांत ग्रंथकाराच्याच भाषेत सांगणें योग्य होईल. तो असा—" या परीक्षणाच्या अंतीं वैदिक व सुमेरी या उभय संस्कृती आर्यवंशीय असून त्या उपर्युक्त देशांत येण्यापूर्वी उत्तरध्रुवसंनिध प्रदेशीं एकरूप होत्या व त्या ठिकाणीं या उभयतांच्या मातृस्थानीं असलेल्या या मूळ आर्यसंस्कृतीचा आद्यकाळ खि. पू. आठ हजार वर्षे हा होता, त्यानंतर तेथें झालेल्या महाप्रलयामुळें तत्रस्थ आर्योनीं दक्षिण मार्गानें स्थलांतर केलें, तसें करतां करतां त्यांतील एक शाखा सुमेरमध्यें व दुसरी इराण व हिंदुस्थान यांत आली असावी. या प्रवेशाचा काल सुमारें खि. पू. पांच हजार वर्षे हा होता, व त्या कालाच्या आगेमागें हिंदी व सुमेरी

वेदांचा प्राचीन भाग 'दृष्ट' अथवा 'कृत' झाला असा निष्कर्ष एकंदरीनें निघतो असें या विस्तृत निबंधांत दाखविलें आहे." (प्रस्तावना.)

" वस्तुतः मेसापोटेमिया व हिंदुस्थान यांच्यांतील संस्कृतिसाम्य असण्याचें खरें कारण या दोन्ही शाखा उत्तरधृव प्रदेशीय एका संस्कृतीच्या शाखा आहेत, व त्यामुळें त्यांच्यांत हें विलक्षण साम्य दिसून येत आहे. या उपपत्तीच्या समर्थनार्थ या लेखांतील विवेचन योजलें आहे." (पा. २४).

" या दोघांची मूळ एकच संस्कृति असली पाहिजे, याबद्दल आमच्या मतें शंका येण्यास यत्किंचित्‌हि जागा राहूं नये." (पा. ८५).

" सुमेरी लोक व वैदिक आर्य लोक सर्वांशीं अभिन्न होते, इतकें पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या व संशोधकांच्याच तोंडानें कबूल झालें आहे." (पा. १०८)

सुमेरी व वैदिक आर्य अभिन्न होते आणि त्यांच्या संस्कृतीहि अभिन्न होत्या हा सिद्धांत ग्रंथकारांनीं प्रतिपादन केला आहे. मात्र संस्कृतीचें स्वरूप वर्णन केलें नाहीं. आतां सुमेरी शब्दानें काय समजावयाचें याविषयीं ग्रंथकारांचें म्हणणें काय आहे तें पाहूं.

" युफ्रेटीस व टायग्रीस या दोन नद्यांच्या दुआबांत अत्यंत प्राचीन काळीं एक महाप्रबळ अशी संस्कृति असलेली राष्ट्रें विद्यमान होतीं. त्यांतील सर्वांत प्राचीन राष्ट्रास सर्वसामान्यत्वानें सुमेरिया असें नांव देण्यांत येतें. ज्या मानववंशांतील लोकांचें हें राष्ट्र होतें, त्यांचें नांव सुमेरिअन् असें होते व त्यामुळें त्यांच्या संस्कृतीला सुमेरिअन् अथवा सुमेरी संस्कृति असें नांव रूढ झालें आहे." (पा. ३).

" त्या कालच्या संस्कृतीस, सुमेरी, खाल्डियन् व बॅबिलोनियन अशा त्रिविध नांवांनीं उल्लेखिलें जातें." (पा. ६).

" पुढें कांहीं कालानें याच प्रदेशाला खाल्डिया हें नांव प्राप्त झालें व तेथील लोकांचें मानवजातिदर्शक सुमेरिअन् हें नांव मात्र कायम ठेवण्यांत आलें. या सुमेरिअन् अथवा खाल्डियन् लोकांचें या प्रदेशावर अविच्छिन्न साम्राज्य ३००० वर्षांपर्यंत चाललें होतें. (पा. ३) मेसापोटामिया देशांत असीरिअन् अथवा असुरी लोकांचेंहि साम्राज्य दीडशें दोनशें वर्षें चाललें (पा. ५).

याचा अर्थ असा कीं, मेसापोटामियांत सुमेरी, बॅबिलोनियन, खाल्डियन् व असुरी इतकीं साम्राज्यें झालीं. या सर्व प्रबळ राष्ट्राची संस्कृति एक होती. या संस्कृतीलाच सुमेरी, खाल्डियन् आणि बॅबिलोनियन् असें म्हणतात. तात्पर्य सुमेरी म्हणजे खाल्डियन् अथवा बॅबिलोनियन्. अर्थात् खाल्डियन संस्कृतीलाच ग्रंथकार सुमेरी संस्कृति म्हणतात. बॅबिलोनियन याचें भाषांतर रा. आपटे यांनीं सुमेरी शब्दानें केल्याचें पान ७२ वरुन उघड दिसतें. उ. ब्राऊनसाहेबांच्या ग्रंथांतील खालील उतारा त्यांनीं दिला आहे. apparently the Babylonian and Indian Systems of calculations were of common origin.

याचें भाषांतर–अर्थात् (!) हिंदी व सुमेरी युगपद्धतीच्या कालगणनेचा मूळ एकच आधार असला पाहिजे हें उघड होतें.

आतां रा. आपटे सुमेरी संस्कृति कशाला म्हणतात हें आपणांस समजलें. सुमेरी संस्कृति व पंजाब सिंधमधील नवीन शोध लागलेली भूमिगत संस्कृति या दोन एकच आहेत असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. पान १३ वर खालील वाक्यें वाचण्यासारखीं आहेत. "या सर्व साम्यावरून या दोन संस्कृतींचा (वैदिक व सुमेरी) दृढ संबंध असावा, हा तर्क फार वरच्या कोटीवर जाऊन पोचला. परंतु ईश्वराच्या मनांत हा सिद्धांत केवळ तर्कप्रतिष्ठच ठेवावा असें नसून त्याची 'प्रत्यक्ष परीक्षणैर्व्यक्ति' करावी असें होतें, असें दिसतें.' कारण जणूं काय त्याच्या संकेतानुरूप सन १९२५ सालीं पंजाब व सिंध येथें प्राचीनवस्तुशास्त्रासाठीं उत्खनन केलें जात असतां, फार विलक्षण शोध लागला." ही नूतनलब्ध संस्कृति द्राविडी आहे असेंहि आपणांस श्री. आपटे सांगतात. "हिंदुस्थानांत येण्यापूर्वी ज्या लोकांची येथें वस्ती होती, व ज्यांना आर्य लोक असुर असें म्हणत, त्यांच्या संस्कृतीचे सांपडलेले हे अवशेष होत....... ही संस्कृति द्रविडी लोकांची असावी. असेंच बळकट अनुमान होतें. (पा. १६)." यापुढें माहेंजो-दारो व हराप्पा येथें सांपडलेल्या शिक्यांचें व त्यांवरील लिखाणांचें विवेचन केल्यावर पान २० वर ग्रंथकार म्हणतात हे एतद्देशीय लोक जाड ओठांचे द्रविडवंशीय होते. यावरून द्राविडी व सुमेरी संस्कृति अभिन्न होती असेंच श्री. आपटे यांनीं सिद्ध केल्याचें दिसतें. यामध्यें वैदिक संस्कृति कोठें येते हें कोडें आम्हांला अद्यापि नीट उकललें नाहीं. का वैदिक आणि द्राविडी संस्कृति एकच समजावयाची! सर्व पुस्तक अनेक वेळां वाचूनहि आम्हांस कांहीं बोध झाला नाहीं आणि म्हणून या पुस्तकाचें परीक्षण आम्ही भीत भीत करीत आहों असें आरंभींच म्हटलें तें एवढ्याकरतांच. द्राविडी व वैदिक संस्कृति अभिन्न हा अपूर्व शोध ग्रंथकारांनीं लावला असेल तर कोण जाणें! हा ग्रंथ स्वतंत्र संशोधनात्मक आहे असें अनेकवार ग्रंथकार आपणांस सांगत आहेत. रा. आपटे यांना "शक्य तितक्या कसोशीनें व साकल्यानें असें अध्ययन करतां सुमेर व हिंद या दोनहि संस्कृतींमध्यें उभय सहोदरांप्रमाणें संपूर्ण साम्य असल्याचें प्रतीत झालें." हिंद, भारतीय, द्राविडी, वैदिक या सर्व संस्कृति एकच कीं काय? यानंतर "शास्त्रीय चिकित्सेची कसोटी लावून त्यांचें परीक्षण मूळ ग्रंथावरून कोणीहि केलेलें नव्हतें. तें या पुस्तकांत प्रथमतःच केलेलें आढळेल." पुढें "हा निबंध अनुवादात्मक अथवा संकलनात्मकहि नसून संशोधनात्कम असल्यानें यावर मतभेद उत्पन्न होणें मुळींच अस्वाभाविक नाहीं. तथापि शक्य तितकी शास्त्रीय चिकित्सा मार्मिक विवेचन व तार्किक अनुमान यांत मी स्वीकारलीं आहेत." पान २६ वर "कोणत्याहि कारणानें असो या वृत्र कथेचा संपूर्ण संदर्भेतिहास लो. टिळकांनीं संशोधिला नाहीं." तसेच "आजपर्यंत प्राच्य अथवा पौरस्त्य पंडितांपैकीं कोणालाहि ही कल्पना सुचलेली नाहीं." (पा. ४५) असल्या लिखाणानें ज्यांना आपल्या बौद्धिक सामर्थ्याबद्दल जात्याच इतका विश्वास वाटत नाहीं ते अगदीं गर्भगळीत झाल्यावांचून राहणार नाहींत. म्हणूनच आम्हांला श्री. आपटे यांनीं सिद्धांत कोणता व कसा प्रतिपादन केला आहे तें समजलें नाहीं असें म्हणावें लागलें. मेसापोटेमियांत सुमेरी व खाल्डियन मिळून एक मिश्र संस्कृति निर्माण झाली. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत वैदिक व द्राविडी संस्कृतींचें मिश्रण झालें. या दोन मिश्र संस्कृतींचें तादात्म्य तर रा. आपटे यांना प्रतिपादन करावयाचें नसेलना? मेसापोटेमियांतील अगदीं प्राचीन सुमेरी संस्कृति व वैदिक

संस्कृति यांचें अभिन्नत्व ते सिद्ध करताहेत कीं काय असें एकादे वेळ वाटूं लागतें. पण मग त्याचा संबंध पंजाब सिंधमधील नवीन शोधांशीं कसा येतो तें कळत नाहीं. शिवाय मिश्र संस्कृतीच्या पाठीमागच्या लेखांवरून सुमेरी संस्कृति सिद्ध करण्याचा प्रयत्न शास्त्रीय कसा ठरेल तेंहि समजत नाहीं. या विटांच्या लेखांत सुमेरी संस्कृतीचें निःसंशय प्रमाण अमुक रीतीनें सांपडतें असें रा. आपटे यांनीं कोठें दाखविलें नाहीं, एकंदरींत पुस्तक न समजल्यामुळें अभिप्राय देणें कठीण झालें आहे.

आतां रा. आपटे यांचा अभिप्राय कांहींहि असो. एवढी गोष्ट खरी कीं त्यांनीं ज्या साधनांचा उपयोग केला आहे त्यांच्या विश्वसनीयतेबद्दल अद्यापि एकवाक्यता झाली नाहीं. माहेंजो-दारो येथील विटांवरचीं अक्षरें अद्यापि लावावयाचीं आहेत. त्या लिपीचें संशोधन व्हावयाचें आहे असें लोकशिक्षणांतील या पुस्तकाचें परीक्षण करणारे तज्ञ म्हणत आहेत. तसेंच डॉ. लेले यांनीं सहविचार मासिकांत या पुस्तकावर अभिप्राय देतांना रा. आपटे यांनीं इंग्रजीचें भाषांतर चुकीचें केल्याचें दाखविलें आहे. म्हणून त्या संबंधानें जास्त विचार करण्याचें प्रयोजनच नाहीं. ऋग्वेद आणि अथर्ववेद यांत श्री. आपटे कालदृष्ट्या व संस्कृतिदृष्ट्या भेद मानीत नाहींत. मग रामायणांतील वचनांवरून सुमेरी हिंदी संस्कृति एकच असें यांनीं ठरविलें तर त्यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. लो. टिळकांची स्तुति व त्याबरोबरच त्यांचें वैगुण्यप्रदर्शन यांचा मेळ श्री आपट्यांनीं मोठ्या कुशलतेनें घातला आहे. सिनीवाली शब्द टिळकांच्या दृष्टींतून निसटला असेल अशी कल्पना तरी रा. आपटे यांना कशी करवली याचें आम्हांस आश्चर्य वाटतें. कारण हा शब्द नुसत्या अथर्ववेदांतच नव्हे तर इतर धर्मग्रंथांत कायमचें स्थान पटकावून बसला आहे.

साधर्म्यावरून अनुमानें काढणें तीं फार जपून काढावीं लागतात. आर्य देवतांचीं नांवें रानटी जातींतहि आढळतात. उ. " kashshi were a wild tribe of barbarians"

पण या रानटी लोकांचे देव मरुत व सूर्य हे होते. रा. आपटे बॅबिलोनी, असूर, खाल्डियन, वगैरे सर्व लोकांस सुमेरिअन समजतात. पण हे लोक सेमेटिक वंशाचे होते असें मानण्यांत येत असून सुमेरी लोकांहून त्यांचें भिन्नत्व पाश्चात्य ग्रंथकारांनीं दर्शविलें आहे. उ. सेमेटिक लोकांनीं सुमेरी लोकांची ५५० मूळाक्षरांची लिपी उचलली." "सेमेटिक बॅबिलोनी लोकांनीं सुमेरी लोकांना हाकलून लावलें." "सेमेटिक लोकांनीं आपल्या धन्यांचें ( सुमेरी लोकांचें ) वाङ्मय आत्मसात् केलें." इत्यादि वाक्यप्रयोग विद्वान ग्रंथकार करीत असतात. खुद्द रा. आपटे यांनीं बॅबिलोनी लोक मध्यम नाकाचे व सुमेरी निरुंद नाकाचे होते ही गोष्ट नमूद केली आहे. मग या दोघांना एकाच कुंडींत रा. आपटे कां ढकलतात न कळे !

तैमात शब्द अथर्व वेदांत एकाच कांडांत फक्त दोन ठिकाणीं आला आहे. तसेंच आलिगी, विलिगी हे शब्द तर एकेकदाच आलेले आहेत. यावरून अथर्व वेदांतील कांहीं कल्पना असुरी संस्कृतींतील आहेत इतकेंच सिद्ध होतें. पण यावरून तादात्म्य सिद्ध कसें होणार ! प्रलयाची आख्यायिका बायबलांत आहे तेव्हां यहुदी व आर्य एकच असेंहि म्हणतां येईल. असल्या गोष्टींनीं तादात्म्य सिद्ध होणार नाहीं. खाल्डियन लोकांपासून राशी परंपरेनें हिंदूंनीं घेतल्या म्हणून तेवढ्यावरून हिंदू आणि आर्य एकच लोक होते असें ठरत नाहीं. आमच्या मतें या पुस्तकांत योजलेली तर्कपद्धति अशुद्ध असल्यामुळें रा. आपटे यांचें मत कोणाला मान्य होईल असें वाटत नाहीं. पण वर सांगितल्याप्रमाणें रा. आपटे यांचें काय म्हणणें आहे तेंच कळण्यासारखें नसल्यामुळें या परीक्षणाचा अधिक विस्तार करणें योग्य होणार नाहीं.

**स्वनितांजलिः**— ( भारत-कवि-मंडळ कोल्हापूर, किं. ४ आणे.) हा कविता-संग्रह १९२६ सालीं प्रसिद्ध झाला.

**प्रेमपरागः**— ( भारत-कवि-मंडळ कोल्हापूर ) हा कवितासंग्रह १९२७ सालीं प्रसिद्ध झाला. किं ८ आणे.

**माधवीः**— ( संग्राहक वाङ्मय विहार मंडळ नाशिक, किं. ८ आणे ) अभिप्राय पुढील अंकीं.

**अल्बेरुणीची गीताः**— ( ले. वाङ्मय विशारद वि. प्र. लिमये किं. कागदी बांधणी १ रु. कापडी बांधणी १॥ रु. ) अभिप्राय पुढील अंकीं.

**अहवाल–चौदावें महाराष्ट्र-साहित्य-संमेलन-बेळगांव स. १९२९ :**— ( प्रकाशक वाङ्मय-चर्चा-मंडळ बेळगांव किं. २ रु.)

**सिंहास शहः**— (ले. श्री. रा. टिकेकर किं. २ रु.) अभिप्राय पुढील अंक

**वैदिक कर्मयोगः**— अंक ६, ७, ८. (वर्ष पहिलें)

**भारत मित्रः**— अंक ८ ते १०.

**लोकमित्रः**— वर्ष ३९ अंक ६ वा.

**मालव-साहित्यः**— पुस्तक १ लें अंक २.

**सद्विचारः**— वर्ष ८ अंक४.

१ भारतधर्मप्रकाशः —चिटणीस भारतधर्ममंडळ पंढरपूर.

२ कर्म–निश्चय —ले. व्यं. रा. मोहोळकर भारत धर्म मंडळ-प्रकाशित गीता-धर्मशिक्षणमाला पुष्प १ लें. पंढरपूर किं. ४ आणे.

३ मुंबई उपनगर जिल्हा साहित्यसभा, व्हिले पारले येथें भरलेल्या साहित्य-संमेलनाचा अहवाल.

४ सार्थ ज्ञानेश्वरीसार–डॉ. शं. अ. जोशी सदाशिव पेठ पुणें किं. ८ आणे अभिप्राय पुढें.

शिवपदी—२प्रकाशक श्री. सदाशिव कृष्ण बहुलेकर चिटणीस साहित्यसेवा-मंडळ कऱ्हाड किं. ८ आणे. शिवाजी महाराजांच्या त्रिशतसांवत्सरिक उत्सवाच्या निमित्तानें अनेक स्त्रीपुरुषांनीं तयार केलेला लेखार्घ्योपहार कऱ्हाडच्या साहित्यसेवा मंडळानें महाराष्ट्र जनतेस अर्पण केला आहे. लेख वाचनीय आहेत. शिवाजीच्या साहित्य सेवेंत निरनुस्वारी भाषेची कल्पना नव्हती ती उणीव या पुस्तकानें भरून काढली आहे. असें म्हणावें लागतें.

# शंका चर्चा-३.

## गोमंतक कीं गोमांतक ?

श्री. पै यांच्या पुस्तकावर अभिप्राय देतांना गोमंतक व गोमांतक यांपैकीं खरा उच्चार कोणता याविषयीं शंका आल्यावरून श्री. पै यांसच या शब्दाची व्युत्पत्ति विचारली. त्यांनीं श्री. वामनराव रघुनाथ वर्दे वालावलीकर यांजकडून एतद्विषयक माहिती मिळविली. श्री. वालावलीकर गोमंतक शब्दच बरोबर आहे असें मानून त्याची व्युत्पत्ति येणेंप्रमाणें देतात.

## गोमन्तक शब्दाचें निरुक्त

'गोमन्तक' हा शब्द बरेच जण 'गोमान्तक' असा लिहितात व उच्चारतात. परंतु हें दुसरें रूप ग्राह्य धरल्यास त्याचा अर्थ ओढाताणीनें लावावा लागतो आणि तोही चांगला लागत नाहीं. श्री. वि. का. राजवाडे ह्यांनीं गोमान्तक शब्दाची व्युत्पत्ति, 'गोम + अन्तक = गोमान्तक' अशी दिली आहे. ( भारत-इतिहास-संशोधक मंडळ, पुणें, अहवाल शके १८३३, पृ. १५० ). परंतु हा गोम कोण, अन्तक कोण, अन्तकानें गोमाचा जीव कां व केव्हां घेतला आणि ह्या दोघांचीं नांवें एकत्र येऊन तें देशाचें नांव बनण्यास ते कोणत्या योग्यतेचे पुरुष होते, वगैरेची फोड राजवाड्यांनीं करावयास पाहिजे होती ती केलेली नाहीं व दुसऱ्याही कोणाला करतां येत नाहीं. म्हणून त्यांची व्युत्पत्ति टिकत नाहीं.

गोमान्तक हा शब्द अग्राह्य मानण्यास दुसरा आधार असा कीं, संस्कृत ग्रंथांतून 'गोमान्त' असें रूप न आढळतां 'गोमन्त' असेंच रूप सांपडतें. ह्या 'गोमन्त' शब्दाला 'क' हा तद्धित प्रत्यय लागून 'गोमन्तक' हा शब्द बनला आहे. सौंदर्य, प्रियत्व व छोटेपणा ह्या तिन्ही कल्पना एकदम दाखवावयाच्या असतां नामाला हा प्रत्यय लावतात. उदाहरणार्थ, पुत्रक म्हणजे आवडीचा, सुंदर व लहान पुत्र. गोमन्तकाच्या शेजारच्या 'अपरान्त' व 'कर्णाट' ह्या देशांच्या नांवांनाही 'क' हा प्रत्यय लागून त्यांचीं 'अपरान्तक' व 'कर्णाटक' अशीं रूपें बनल्याचें इतिहासज्ञांना विदितच आहे.

आतां 'गोमन्त' शब्दाचा अर्थ काय तो पाहूं. गो म्हणजे गाय किंवा गुरूं. अर्थात् गोमन्त म्हणजे गुरांनीं भरलेला देश. कोंकणपट्टीपैकीं गोव्याच्या भागांत प्राचीन काळीं गुरें जास्त होतीं, ह्यामुळें त्या भागाला गोमन्त हें नांव पडलें. वास्तविक कोंकणपट्टी ही गुरांच्या पालनपोषणास योग्य अशी भूमि नव्हे. तथापि त्या प्रदेशाचा गोव्यासारखा एक भाग गुरांच्या पोषणाला योग्य असा असलेला पाहून तेथें प्राचीनकाळीं पोंचलेल्या आर्यांनीं त्या भागाला कौतुकानें 'गोमन्त' हें मंजुळ नांव दिलें असावें. तूर्त जरी गोव्यांत गुरांचा तुटवडा असला तरी प्राचीनकाळीं तीं तेथें विपुल प्रमाणांत होतीं

यांत संशय नाहीं. पोर्तुगिजांनीं आज ४०० वर्षें आपल्या खाण्याकरतां गुरें मारण्याचें काम चालविल्यामुळें व गोव्यांतील बाटविलेल्या लोकांनाही–खिश्चनांनीं गोमांस खावयाची चटक लावल्यामुळें आज गोमंतकांत गुरें दुर्मिळ झालीं आहेत. पण पूर्वी तेथें विपुल गुरें होतीं, त्याला ऐतिहासिक आधार आहे. सोळाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकांत फॅर्नांव लॉपिज दकाश्तांव्येद हा पोर्तुगीज इतिहासकार गोव्यांत पोंचला होता. त्यानें त्या काळचा तेथला चक्षुर्वैसत्यं असा जो इतिहास लिहून १५५२ मध्यें प्रसिद्ध केला त्यांत तो म्हणतो कीं 'तेथें गाई म्हशी कोंबडीं आणि डुकरें पुष्कळ आहेत.'

( Historia do descobriments a conquista da India pelos portuguese per Fernās Lopez da Castanheda, Lisboa, 1833, Livro III, Capit. 8, pp. 23-24 ).

वरील विवेचनावरून 'गोमन्तक' हेंच रूप शुद्ध होय, हें कोणालाहि समजून येईल.

---

**मित्रसमाज, पडघवली**—रा. हरि पुरुषोत्तम दिवेकर व चिं. का. मोडक यांनीं समाजाचा श. १८०१ ते १८५० पर्यंतच्या पन्नास वर्षांचा इतिहास लिहून तो समाजाचे मॅनेजर रा. ना. रा. दिवेकर यांनीं प्रसिद्ध केला आहे. यांत गांवाची माहिती बरीच आहे. "पढघवली" या गांवाचें खरें नांव ढोकशेत असून गांव वसून २५० वर्षेंहि झालीं नाहींत. तथापि मित्रसमाजाची स्थापना कधीं झाली व त्याचे प्रारंभींचे सभासद कोण होते याचा बोध या पुस्तकावरून होत नाहीं. पडघवलीस गांवकरी मंडळी आज ५० वर्षें गणपतीची उपासना नाटकरूपानें करीत आहे. ही एकच गोष्ट त्यांच्या चिकाटीची, जुटीची व हौसेची साक्ष पटवीत आहे. शिकलेली मंडळी नटांचीं कामें करतात. त्यामुळें नाटक प्रेक्षणीय होतें. आमच्या मतें बालगंधर्वासारख्या कोणत्या तरी उत्तम नटाला मंडळीनें दरसाल आपलें नाटक पहाण्यास बोलवावें. दोघांनाहि त्यामुळें फायदा होईल. तसेंच पोटार्थी नटांचें अनुकरण करण्यांत समाधान न मानतां धंदेवाईक नटांस आपलें अनुकरण करण्यास लावण्याची हुरूप बाळगावी. रा. वासुदेवराव दिवेकर सालिसिटर यांच्यासारखे उत्कृष्ट गवयी व नट पडघवलीच्या नाटकांत काम करीत असतां अशा प्रकारचा हुरूप अयोग्य आहे असें कोणीहि म्हणणार नाहीं.



अनुक्रमणिका

# चरित्रकोश

कार्यांतून कार्य उद्भवतें म्हणतात तें कांहीं खोटें. नाहीं. ज्ञानकोशानंतर शब्द-कोश होत आहे. तोंच चरित्रकोश तयार करण्याची उमेद बाळगून श्री. चित्राव-शास्त्री कामास लागले आहेत. मराठी भाषेची योग्यता वाढविण्यास हीं कामें निःसंशय कारणीभूत होतील. साहित्यसेवकास, कोश, सूची, वगैरे संदर्भग्रंथांची उणीव पावलों पावलीं भासते. श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनीं बरेंच काम तयार केलें आहे. पौरा-णिक भूगोल, वंशावळी, पुराणें व उपपुराणें यांची संख्या व नांवें इत्यादि उपांगें तयार असून मुख्य कामहि लोकांच्या पुढें ठेवण्यापर्यंत होत आलें आहे. पण पैशाच्या अभावीं हें काम रेंगाळणार अशी भीति वाटते. तरी सधनांनीं काम बघून खात्री करून घेऊन द्रव्य सहाय्य करावें. मुख्य कामाला उपयुक्त म्हणून तयार केलेला भाग लवकर स्वतंत्र रीतीनें छापण्यांत यावा. पुण्यांत छापखाने पुष्कळ आहेत. १०।२० पानें वर्षाचीं फुकट छापून द्यावयाचीं असा यांनीं नियम केल्यास स्वार्थ परमार्थ दोनहि साधतील. कोणतेंहि महत्वाचें लिखाण पैशाकरतां अडून राहणार नाहीं. शब्दकोश व चरित्रकोश लवकर प्रसिद्ध होणें जरूर आहे,

चरित्रकोशमंडळानें कच्च्या स्वरूपांत प्रसिद्ध केलेलें पराशरचरित्र पुढें देत आहों त्यावरून मंडळाच्या उद्योगाची कल्पना करतां येईल.

आम्हांस थोड्या सूचना कराव्याशा वाटतात त्याचा विचार होईल अशी आशा आहे. पराशराची माहिती दिली आहे तिला चरित्र म्हणणें योग्य होणार नाहीं. पुढें प्रसिद्ध होणारें शिवाजीचें अथवा बाजीरावाचें चरित्र आणि पराशराच्यासारखें पौराणिक पुरुषांचें चरित्र हीं एकाच जातीचीं नाहींत. पण त्याहींपेक्षां महत्वाची बाब म्हटली म्हणजे आजपर्यंत पाश्चात्यांनीं कोणती माहिती जमविली व त्यांच्यापुढें चरित्रकोशमंड-ळानें अधिक माहिती कोणती शोधून काढली याचा स्पष्ट उल्लेख सर्वत्र करण्यांत आला पाहिजे. त्यायोगानें मंडळाच्या कार्याचा गौरव विशेष होईल. पाश्चात्यांनीं जुळविलेली माहिती मराठींत आणली तरी तें सुद्धां काम कमी मोठें होईल असें नाहीं. पण लोकांच्या मनावर तें इतकें ठसणार नाहीं. पाश्चात्य विद्वानांनाहि आपल्या चरित्र-कोशाचा उपयोग होईल ही आपली महत्वाकांक्षा असली पाहिजे.

या चरित्रांत पराशर, पाराशर, बृहत्पाराशर या शब्दांसंबंधानें थोडा अधिक खुलासा करावयास पाहिजे होता. औफ्रेख्टचा निर्देश चरित्रकारांनीं कोठेंच केल्याचें दिसत नाहीं.

असो; विद्वानांनीं व धनिकांनीं या कार्यास सहाय्य करून निर्दोष असा कोश त्वरित प्रसिद्ध करविण्याचें पुण्य संपादन करावें.

**पराशर**—ऋग्वेदांत पराशर हा शब्द एकदां इंद्राला उद्देशून व एकदां वसिष्ठ व शतयातु यांच्या बरोबर आला आहे. कदाचित् शतयातु हें विशेषण असून पराशर वसिष्ठ हें एकाच व्यक्तीचें नांव संभवतें. सुदासच्या विजयासंबंधींच्या महत्त्वाच्या सूक्तांत हा उल्लेख आला आहे ( ऋ. ७.१८.२१ ). ऋग्वेदांतील कांहीं सूक्तें पराशराच्या नांवावर आहेत. ( ऋ. १. ६५–७३; ९. ९७. ३१–४४ ). कात्यायनकृत सर्वानुक्रमणींत सूक्तद्रष्टा पराशर शक्तिपुत्र होता असें म्हटलें आहे. निरुक्तांत 'पराशीर्णस्य स्थविरस्य जज्ञे' ( ६–३० ) अशी पराशर शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे. तिचा अक्षरशः अर्थ घेऊन पराशर हा वसिष्ठाचा मुलगा असा अर्थ कांहीं लोकांनीं केला आहे तो बरोबर नाहीं. सर्व मुलें मेल्यामुळें निराधार झालेल्या म्हाताऱ्या वसिष्ठाला आधार उत्पन्न झाला असा त्या व्युत्पत्तीचा अर्थ होतो, तोच बरोबर दिसतो. म्हणूनच महाभारतांत तसाच अर्थ घेतला आहे ( महाभा. आ. १७८ ).

एकदां वसिष्ठ वैतागून आश्रमांतून बाहेर पडला. तेव्हां शक्तीची विधवा पत्नी अदृश्यन्ती ही नकळत त्याच्या मागोमाग चालली होती. वसिष्ठाच्या कानावर वेदध्वनी येऊं लागला. तेव्हां त्यानें मागें वळून पाहिलें तों अदृश्यन्तीच्या पोटांतून वेदध्वनी येत आहे असें आढळल्यावरोबर अजून आपला वंश आहे असें समजून तो आश्रमांत परत आला. पुढें कांहीं दिवसांनीं अदृश्यंतीला पराशर झाला. याच्या आजोबानें म्हणजे वसिष्ठानें याचें पालनपोषण केलें. तो वसिष्ठासच बाप समजत असे व नेहमीं 'बाबा' बाबा म्हणून त्याच्या मागें लागे. वसिष्ठाला 'बाबा' म्हणून हांक मारली कीं, अदृश्यंतीच्या डोळ्यांस साहजिकच पाणी येई. अदृश्यंतीनें किती तरी वेळां पराशराला सांगितलें असेल कीं, तूं वसिष्ठांना बाबा न म्हणतां आजोबा म्हण. पण पराशराला त्याचा अर्थच समजत नसे. पराशराला समजूं लागल्यावर अदृश्यंतीनें त्याला आपल्या नवऱ्याच्या राक्षसाकडून झालेल्या मृत्यूची हकीकत समजावून सांगितली. त्याबरोबर पराशराच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. त्याला इतका क्रोध आला कीं, तो जगाचा नाश करण्यास प्रवृत्त झाला. पण वसिष्ठानें और्वाची गोष्ट सांगून पराशराला लोकांचा नाश करण्यापासून निवृत्त केलें. पण राक्षसांविषयींचा राग त्याच्या मनांतून जाईना. त्यानें सर्व आबालवृद्ध राक्षसांचा वध करण्याच्या हेतूनें राक्षससत्र आरंभिलें. वसिष्ठ पहिल्याप्रमाणें पुन्हा त्याला आडवा आला नाहीं. पण इतर ऋषींमध्यें मात्र खळबळ होऊन राक्षसांच्या संरक्षणाकरितां अत्रि, पुलह, पुलस्त्य, क्रतु आणि महाक्रतु इत्यादि मोठमोठे मुनि तेथें आले. त्यांपैकीं महामुनि पुलस्त्य पुढें झाला आणि त्यानें पराशरास राक्षससत्रापासून निवृत्त करण्याचा प्रयत्न केला. पुलस्त्यानें अनेक दृष्ट्या राक्षस निरपराधी व निरुपद्रवी असल्यामुळें त्यांचा वध करणें योग्य नव्हे असें सांगितलें. तेव्हां वसिष्ठानेंहि मध्यस्ती करून नातवास राक्षससत्रापासून निवृत्त केलें. राक्षससत्र थांबल्यावर पुलस्त्यानें पराशरास सकलशास्त्रपारंगत होशील व पुराणवक्ता होशील असे दोन वर दिले ( वि. पु. १. १ ). पराशरानें राक्षससत्र करण्याकरितां सिद्ध केलेला अग्नि

हिमालयाच्या उत्तरेस एका अरण्यांत टाकला. तो अग्नि अद्यापिहि पर्वदिवशीं राक्षस, पाषाण व वृक्ष भक्षण करतांना दृष्टीस पडतो. ( महाभा. आ. १७८-१७९; वि. पु. १. १; लिं. पु. ६४ )

पराशर तीर्थयात्रेस गेला असतां यमुनेवर सत्यवती त्याच्या दृष्टीस पडली. तिच्या अंगाला मत्स्यासारखा वास येत होता. पराशर कामुक होऊन तिची प्रेमयाचना करूं लागला. तेव्हां भोंवतालच्या ऋषींचा अडथळा वाटून पराशरानें तेथें धुकें उत्पन्न केलें व अडथळा दूर केला. तिनें कन्याभाव दूषित होईल अशी शंका काढली. त्याचें त्यानें निराकरण केलें. तिच्या मागणीवरून तिच्या अंगाचा एक योजनपर्यंत सुगंध येईल अशी व्यवस्था केली. त्यापासून तिला वेदव्यास नांवाचा मुलगा झाला. यमुनेच्या द्वीपांत जन्म झाला म्हणून व्यासाला द्वैपायन असें म्हणूं लागले ( महाभा. अ. ६४ ).

महाभारतांत याच्या धर्मविषयक मतांचा सन्मानानें उल्लेख आला आहे ( महाभा. अनु. १४६-१५२ ).

पराशरानें जनकाला केलेल्या तत्त्वज्ञानाच्या उपदेशाचा अनुवाद भीष्मानें धर्मराजाला सांगितला आहे. त्यालाच पराशरगीता असें म्हणतात. ( महाभा. शां. २९१-२९८ ). पराशरानें विष्णुपुराण मैत्रेयाला सांगितलें. तथापि त्याला सर्वत्र महर्षिव्यासप्रणीत असेंच म्हणतात. याला गौरिवीति असेंहि नांव असावें.

याशिवाय पराशराच्या नांवावर खालील ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

( १ ) बृहत्पराशरहोराशास्त्र ( १२०० श्लोकांचा ज्योतिषग्रंथ ).

( २ ) लघुपाराशरी.

( ३ ) बृहत्पाराशरीय धर्मसंहिता ( ३३०० श्लोकांची ).

( ४ ) पाराशरधर्मसंहिता ( स्मृति ).

( ५ ) पराशरोदितं वास्तुशास्त्रम् ( विश्वकर्म्यानें याचा उल्लेख केला आहे ).

( ६ ) पाराशरसंहिता ( वैद्यकशास्त्र )

( ७ ) पराशरोपपुराण ( माधवाचार्यांनीं यांतील उतारे घेतले आहेत ).

( ८ ) पराशरोदितं नीतिशास्त्रम् ( याचा विष्णुशर्म्यानें व चाणक्यानें उल्लेख केला आहे ).

( ९ ) पराशरोदितं केरलसारम्.

पराशरानें आपल्या ज्योतिषग्रंथांत वसंतसंपाताची स्थिति दिली आहे. त्यावरून पहातां हा इ. स. पूर्वी तेराव्या अगर चौदाव्या शतकांत होऊन गेल्याचें कळतें (संस्कृत कविचरित्र ). हे सर्व ग्रंथ एकाच पराशराचे असणें शक्य नाहीं.

हा वसिष्ठकुलांतील मंत्रद्रष्टा आहे ( ऋ. १ ६ ५. ७३ ). याच्या वंशांत वसिष्ठ, मित्रावरुण आणि कुंडिन या तीन प्रवरांचे गौरपराशर, नीलपराशर, श्वेतपराशर, कृष्णपराशर, श्यामपराशर व धूम्रपराशर असे सहा भेद झाले होते ( म. पु. २०० ).

## परिषद्वार्ता

### महाराष्ट्र-शारदा-मंडळ.

या मंडळाची घटना मंडळाचे कार्यवाह सरदार चं. सं. आंग्रे यांनीं प्रसिद्ध केली आहे. मंडळाकरतां चाळीस सभासदांचें तज्ञ मंडळहि नेमलें आहे. परीक्षकमंडळ, परीक्षणमंडळ, परिषदमंडळ व पत्रिकामंडळ असे तज्ञांचे चार पोटविभाग आहेत. शारदा-मंडळाचे सभासद कोण तें मात्र ध्यानांत येत नाहीं. कारण केन्द्रमंडळ एक निराळें आहेच. या मंडळाकडून एक व्याख्यानमाला सुरू होणार आहे. मंडळाचें कार्यालय ग्वालेर येथें असणार आहे. घटना सिद्ध झाली. आतां कार्य सिद्ध व्हावयाचें आहे. तें लवकरच होवो.

म. सा. प. च्या कार्यकारी मंडळाच्या बैठकी

१९ जानेवारी १९३०

हजर—१ चापेकर २ काणे ३ ओगले ४ आळतेकर ५ वा. म. जोशी ६ घारपुरे ७ फाटक ८ सुंदरराव वैद्य

विषय—( १ ) संमेलनाचे अध्यक्ष

१ रा. खाडिलकर
२ ,, वा. म. जोशी
३ ,, वा. गो. आपटे
४ ,, कृ. अ. केळूसकर

ह्या अनुक्रमानें नांवें सुचवावीं.

( २ ) संमेलनाकरतां निबंधाचे विषय सुचविणें

( १ ) कीर्तनसाहित्य
( २ ) मराठी भाषा व मुंबई विश्वविद्यालय.

( ३ ) अभिनंदन.

खाडिलकर यांची मुक्तता झाली त्याबद्दल

( ४ ) दुखवटा

प्रो. भानू व श्री. गो. मा. चिपळूणकर यांच्या निधनाबद्दल.

( ५ ) परिषदेच्या कामासाठीं सहा माही ३०० रु. पगारावर एक कायम माणूस ठेवावा व त्याच्या पगाराकरितां एक स्वतंत्र फंड उभारावा.

( ६ ) निरुक्ताचें भाषांतर

निरुक्ताचें भाषांतर हा ग्रंथ इचलकरंजीकर ग्रंथमालेंतून छापण्याची तजवीज करण्याचें काम श्री. ज. र. घारपुरे यांजवर सोपवावें.

# रावसाहेब मंडलिकांचें चरित्र

रावसाहेब मंडलिकांच्या चरित्राचें परीक्षण साहित्य-पत्रिकेच्या दुसऱ्या वर्षाच्या तिसऱ्या अंकांत प्रसिद्ध झालें आहे. त्यांत परीक्षण करतांना श्री. के. ल. ओगले यांनीं रावसाहेबांसंबंधीं एक अशी आख्यायिका म्हणून दिली आहे कीं, त्यांच्या मातुःश्री एकदां पंक्तींत वाढीत असतांना त्यांच्या हातून घांसभर भात अधिक पानांत पडला. त्यावेळीं आपल्या करारीपणास अनुसरून रावसाहेबांनीं तेवढा घांसभर भात मातुःश्रींच्या परातेंत परत टाकलाच. तेव्हांपासून मायलेकांचें दर्शन झालें नाहीं असें सांगतात. यावर श्री. ओगले म्हणतात ही गोष्ट त्यांच्या मोठेपणास गालबोट लावणारी असली तरी मोठ्यांच्या हातूनहि प्रसंगीं अत्याचार होतात. यास्तव तें टाळण्याचा शक्य तो प्रयत्न केला पाहिजे हाच बोध तिच्यापासून घ्यावयाचा आहे.

यासंबंधानें चरित्रकार श्री. हवालदार लिहितात. "पुरे म्हटल्यावर आईच्या हातून घांसभर भात पानांत अधिक पडला म्हणून कोणताहि मुलगा जन्मभर आईचें दर्शन घेणार नाहीं, किंवा तो भात आपल्या परातींत परत मुलानें टाकला म्हणून कोणतीहि आई जन्मभर मुलाचें दर्शन घेणार नाहीं असें होणें शक्य नाहीं, असें श्री. ओगले यांनीं थोडा विचार केला असता तर त्यांच्या ध्यानांत आलें असतें. निदान परीक्षणास घेतलेल्या ग्रंथांतील "रावसाहेबांच्या मातोश्री" व "नाना मंडलिकांचा प्रपंच" हीं प्रकरणें जर त्यांनीं वाचलीं असतीं तर ही आठवण निदान "मायलेकांचें तेव्हांपासून दर्शन झालें नाहीं" एवढा तिच्यांतील भाग—वगळल्याशिवाय दिली नसती. पहिल्या प्रकरणांत मायलेकांचा एक प्रेमळ संभाषण प्रसंग आहे. दुसऱ्यांत असा विषय आहे कीं कांहीं वेगळेपणाच्या बोलण्यावरून वडिलांनीं रावसाहेबांस एक रागाचें पत्र लिहिलें. त्यावरून रावसाहेबांनीं पत्रीं वडिलांची क्षमा मागून आशीर्वादाची याचना केली आहे. व एवढें करूनहि उरलेला दुःखाचा उमाळा मातोश्रींस एक पत्र लिहून रावसाहेबांनीं काढून टाकला आहे. हें मायलेकांचें दर्शन न होण्याइतकें वाकडें असण्याचें लक्षण धरावयाचें काय ? परंतु मनुष्यस्वभावच असा कधीं कधीं आढळतो कीं जो दुसऱ्यानें सांगितलेल्या रिकामपणाच्या गोष्टीवर जितक्या उत्सुकतेनें भरंवसा ठेवतो तितक्याच उत्सुकतेनें तो ती गोष्ट भरंवशालायक म्हणून पसरवितो. त्यांतून ती थोर व्यक्तीविषयीं असली म्हणजे थोडया प्रतिष्ठेचा लाभ त्याला झालासा वाटून त्या थोर व्यक्तीच्या अब्रूची आपल्या हातून केवढी हानि होत आहे तिकडे लक्ष देत नाहीं.

या गोष्टींना आधार काय असें विचारतां श्री. ओगले यांकडून एका स्नेह्या-मार्फत कळविण्यांत आलें आहे कीं या गोष्टी त्यांनीं हल्लीं हयात नाहींत अशा रावसाहेबांच्या जन्मग्रामापासून कांहीं कोसांवर राहणाऱ्या दोन गृहस्थांच्या तोंडून



अनुक्रमणिका

ऐकिल्या. परंतु कर्णपरंपरेला पुराव्याच्या दृष्टीनें मान मिळत नाहीं. रावसाहेबांच्या बहिणींपैकीं एक कृष्णाबाई विवलकरीण या अद्याप हयात आहेत. यांचें बहुतेक आयुष्य बाळपणींच वैधव्य आल्यामुळें माहेरींच गेलें.* त्यामुळें या गोष्टी खऱ्या असत्या तर त्यांना कळल्याच असत्या. म्हणून त्यांस मी पत्र लिहिलें त्यावरून त्यांनीं स्पष्ट असें कळविलें आहे कीं, " हें सर्व खोटें आहे. "

" मला भेटून अमुक काळ झाला. तुम्हांस भेटण्याची माझी इच्छा आहे. " अशीं मातोश्रींनीं रावसाहेबांस लिहवलेलीं पत्रें संग्रहीं आहेत. त्याप्रमाणें रावसाहेब मातोश्रीला भेटून आल्याचा पुरावा आहे. नुसत्या तोंडी निरोपावरून रावसाहेब एकदां मातोश्रींस भेटून आले होते. मुरुड येथें गेल्यावर रावसाहेब येथें वसत व त्यांच्या मातोश्री येथें बसत व दोघांच्या गोष्टी चालत असें सांगणारी माणसें हयात आहेत.

असो. श्रीयुत ओगले यांच्या या साधार-निराधार गोष्टी छापण्यांत वाईट हेतु नसेल. पण त्यांनीं या गोष्टींचा आरंभ अथातो दोषजिज्ञासा या झोंकांत करून रावसाहेबांनीं अत्याचार केला असें निःशंकपणें प्रसिद्ध केल्यामुळें त्यांचें निरसन सविस्तर करणें भाग झालें. नाहींतर श्री ओगले यांच्या लेखनाकडे लक्ष न देऊन त्यास नसतें महत्व न देणेंच योग्य होतें. "

मोठ्या माणसांविषयीं खऱ्या खोट्या पुष्कळ आख्यायिका उत्पन्न होतात. मोठेपणाची ही एक खूणच असते. रा. ओगले यांनीं ऐकलेली गोष्ट काल्पनिक असण्याचा संभव नाहीं असें नाहीं. आतां तर रावसाहेबांच्या बहिणीनेंच तिचें निराकरण केल्यामुळें ही किंवदंती निराश्रित नसली, तरी निराधार होती असें धरून चालणें योग्यच होईल. रा. ओगले यांच्या उल्लेखामुळें या लोकवार्तेला कायमची मूठमाती देण्याची संधि आली हें जरी एका प्रकारानें इष्ट झालें तथापि रावसाहेबांचे चिरंजीव श्री. बाळासाहेब यांस त्यामुळें सोसाव्या लागणाऱ्या अस्वास्थ्याबद्दल आम्हांस वाईट वाटतें.

---

* मातोश्रींच्या वृद्धावस्थेंत त्यांचा अंतकाळपर्यंत सेवा करून हल्लीं मात्र त्यांनीं काशीविश्वेश्वराच्या सेवेंत काळ घालविण्याकरतां काशीवास पत्करिला आहे.

**आमचा सायकलचा प्रवासः**—(ले. रा. दा. जोशी, सर प. भा. कॉ. पुणें) हें छोटें प्रवासवृत्त रा. जोशी यांनीं सर परशुरामभाऊ कॉलेजच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध केलें आहे. तीन तरूण कॉलेज—विद्यार्थी पायगाडीवरून उत्तर हिंदुस्थानचा प्रवास करावयास सुट्टीच्या दिवसांत निघाले. १० एप्रील रोजीं पुण्याहून निघालेल्या या विद्यार्थ्यांनीं ३००० मैलांचा प्रवास दोन महिन्यांत आटपून बरोबर ११ जूनला ते पुण्यास परत आले. इंदूर, ग्वालेर, उज्जनी, आग्रा, दिल्ली, मथुरा, लखनौ, झांशी, इत्यादि अनेक इतिहासप्रसिद्ध स्थळें यांना आपल्या प्रवासांत पाहतां आलीं. दोन महिन्यांत ३००० मैल म्हणजे दररोज ५० मैल प्रवास केळकर व जोशी यांना करतां आला. ज्या मनोवृत्तीनें ही प्रवास करण्याची कल्पना या तरुणांत उद्भूत झाली, ती मनोवृत्ती राष्ट्रीयदृष्ट्या शुभसूचक होय यांत संशय नाहीं. आणि म्हणून केळकर बंधू आणि जोशी यांचें आम्ही अभिनंदन करितों. प्रवासास एक प्रकारची धडाडी लागते. आणि कष्ट सोसण्याची तयारी असावी लागते. प्रत्येक तरुणांत हे गूण असणें अवश्य आहे. कारण कोणतेंहि सामाजिक कार्य या गुणांच्या अभावीं करतां येत नाहीं. कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं मोठ्या सुट्टींत कोणत्या तरी ठिकाणच प्रवास करण्याची वहिवाट अवश्य पाडावी. परंतु प्रवासाचा खरा उपयोग निरीक्षणशक्ति असल्याशिवाय होत नाहीं. आणि हल्लींच्या शिक्षणानें निरीक्षण करण्याचें सामर्थ्य अथवा चौकसपणा विद्यार्थ्यांत उत्पन्न होत नाहीं; हा या शिक्षणाचा एक मोठा दोष आहे. एका संस्कृत कवीनें म्हटल्याप्रमाणें उदकांत ज्याप्रमाणें तैलबिंदू विस्तार पावतो त्याप्रमाणें प्रवासाच्या योगानें बुद्धीचा विकास होतो. म्हणून कॉलेजला सुट्टी होण्याचे वेळीं मुलांना प्रवास करण्यास प्रोफेसरांनीं प्रोत्साहन देऊन, मुलांनीं प्रवासामध्यें काय अवलोकन करावें, हें त्यांस समजावून सांगावें. एवढा विस्तार करण्याचें मुख्य कारण हें कीं कांहीं विद्यार्थ्यांमध्यें मधूनमधून प्रवास करण्याची आवड उत्पन्न झाल्याचें दिसून येतें. काश्मीरपर्यंत प्रवास केलेल्या एका स्काऊटचा हस्तलिखित प्रवासवृत्तांत आमच्या पाहण्यांत आला, त्यावरूनहि आमचा असा ग्रह झाला आहे कीं हा विद्यार्थ्यांचा प्रवास न होता, त्यांच्या सायकलीचाच प्रवास होतो. असो. रा. केळकर आणि जोशी यांचें अनुकरण करण्याची बुद्धि इतर विद्यार्थ्यांमध्यें उत्पन्न होईल अशी आम्हांस आशा आहे. मात्र आम्हांस रा. जोशी यांचा वृत्तांत वाचून दोन सूचना कराव्याशा वाटतात. परमुलखांत गेल्यावर महाराष्ट्रियांनीं उतरण्याकरितां महाराष्ट्रियांचेंच घर कधींहि शोधून काढूं नये. महाराष्ट्रियेतर माणसाकडेच शक्य तों बिऱ्हाड द्यावें. कारण त्यायोगें इतर लोकांच्या चालीरिती व स्वभाव यांचें ज्ञान आपणांस आपोआपच होतें. तसेंच प्रवास करणारांनीं दुधावर राहण्याची सवय केल्यास त्यांना कोठेंहि नडणार नाहीं, व खर्चहि कमी येईल.

---

## जाहिराती

साहित्यपत्रिकेंत पुस्तकांच्या जाहिराती घेण्याचें ठरविलें आहे. गरजूंनीं संपादक म. सा. पत्रिका, बदलापूर, या पत्यावर पत्रव्यवहार करावा.

**जयकर्नाटक** (वर्ष ८ अंक ४ माघ शुद्ध. १५ शके १८५१, कानडी मासिक, संपादक, दत्तोपंत बेंद्रे, धारवाड.)

हें कानडी मासिक निघावयास सुरवात होऊन बरेच दिवस झाले, परंतु अलिकडे रा. रा. दत्तोपंत बेंद्रे ह्यांच्या हातांत मासिकाचीं सूत्रें आल्यामुळें मासिकामध्यें पुष्कळच सुधारणा झाली आहे. हल्लीं ज्या पद्धतीवर, 'मॉडर्न रिव्ह्यू' 'रत्नाकर' 'सरस्वती' वगैरे उच्च दर्जाचीं मासिकें प्रसिद्ध होतात त्याच पद्धतीला अनुसरून हें मासिक कानडी भाषेंत प्रसिद्ध केलें जातें.

ह्या मासिकाचें बाह्यांग सुंदर असून आंतील छपाई व टापटीप वाखाणण्यासारखी आहे. त्याचप्रमाणें लेखहि उच्च दर्जाचे व प्रतिभासंपन्न (original) असून परिश्रमपूर्वक लिहिलेले असतात. तसेंच, चालू वर्षी, प्रसिद्ध बंगाली ग्रंथकार रवींद्रनाथ टागोर ह्यांच्या 'राजर्षी' कादंबरीचें भाषांतरहि प्रसिद्ध होत असतें. एकंदरीनें पाहिलें असतां, 'जय कर्नाटकाची' चांगल्या मासिकांमध्यें गणना करण्यास हरकत नाहीं. कन्नड-वाङ्‌मयाची सर्व दृष्टीनें प्रगति होण्यासाठीं ह्या मासिकानें चालविलेला प्रयत्न अगदीं स्तुत्य आहे.

ग. स. जोग, बेळगांव वकील.

# परिषदेची हानी

लिखितं सूक्तं चरितं यैर्मनीषिभिः । अद्यैवापह्रियन्ते धिक् धिक् कालस्य चेष्टितम् ॥

माघ शु ४ रविवारीं सूर्यास्ताबरोबर मराठी ग्रंथकार श्री. वासुदेव गोविंद आपटे यांस देवाज्ञा झाली हें लिहिण्यास आम्हांस अत्यंत दुःख होत आहे. वासुदेव रावजी हे साहित्यपरिषदेचे बऱ्याच वर्षें चिटणीस होते. सध्यां तर ते कार्यकारी मंडळांत होते. त्यांच्या निधनानें परिषदेचा एक निःसीम अभिमानी व कार्यकर्ता नाहींसा झाला ही परिषदेची हानी लहानसहान नाहीं. हें वर्ष एकंदरींत मराठी साहित्यसेवकांस अनिष्ट होते असें दिसतें. कारण गेल्या म. सा. संमेलनानंतर मराठी भाषेला ओजस्वी करणारे संमेलनाचेच अध्यक्ष शिवरामपंत परांजपे निष्प्राण होऊन गेले तों त्यांच्या मागोमाग मराठ्यांच्या इतिहासावर साभिमान व चिकित्सापूर्वक लेख लिहिणारे प्रो. भानू यांचाहि अस्त झाला. आणि आतां मराठी वाङ्मयाचा विस्तार करणारे श्री. वासुदेव रावजी यांनीं आपलाच संकोच केला. अग्निमांद्याच्या विकारानें यांची प्रकृति आज कित्येक वर्षें खालावली होती तरी त्यांचें ग्रंथलेखन सारखें चालू होतें. त्यांच्या लेखणीला विश्रांती मिळून माहीत नव्हती. मरणसमयीं त्यांचें वय ६० वर्षांचें होतें.

### दुरुस्ती

या अंकाचीं पृष्ठें ५७, ५८, ५९, ६०, ६१ व ६२ यांचीं विषयवारीचीं वरील पृष्ठें चुकीचीं पडलीं आहेत. तीं ६५, ६६, ६७, ६८, ६९, ७० अशीं घालून घ्यावीं. मराठीच्या प्राकृत भाषा हा निबंध चुकून प्र. धों. कानिटकर यांच्या नांवावर पडला आहे. तरी प्र. धों. कानिटकर यांच्या जागीं प्र. ह. खाडिलकर अशी दुरुस्ती करून घ्यावी.

**आमचा सायकलचा प्रवास**:–(ले. रा. दा. जोशी, सर प. भा. कॉ. पुणें) हें छोटें प्रवासवृत्त रा. जोशी यांनीं सर परशुरामभाऊ कॉलेजच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध केलें आहे. तीन तरूण कॉलेज–विद्यार्थी पायगाडीवरून उत्तर हिंदुस्थानचा प्रवास करावयास सुट्टीच्या दिवसांत निघाले. १० एप्रील रोजीं पुण्याहून निघालेल्या या विद्यार्थ्यांनीं ३००० मैलांचा प्रवास दोन महिन्यांत आटपून बरोबर ११ जूनला ते पुण्यास परत आले. इंदूर, ग्वालेर, उज्जनी, आग्रा, दिल्ली, मथुरा, लखनौ, झांशी, इत्यादि अनेक इतिहासप्रसिद्ध स्थळें यांना आपल्या प्रवासांत पाहतां आलीं. दोन महिन्यांत ३००० मैल म्हणजे दररोज ५० मैल प्रवास केळकर व जोशी यांना करतां आला. ज्या मनोवृत्तीनें ही प्रवास करण्याची कल्पना या तरुणांत उद्भूत झाली, ती मनोवृत्ती राष्ट्रीयदृष्ट्या शुभसूचक होय यांत संशय नाहीं. आणि म्हणून केळकर बंधू आणि जोशी यांचें आम्ही अभिनंदन करितों. प्रवासास एक प्रकारची धडाडी लागते. आणि कष्ट सोसण्याची तयारी असावी लागते. प्रत्येक तरुणांत हे गूण असणें अवश्य आहे. कारण कोणतेंहि सामाजिक कार्य या गुणांच्या अभावीं करतां येत नाहीं. कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं मोठ्या सुट्टींत कोणत्या तरी ठिकाणच प्रवास करण्याची वहिवाट अवश्य पाडावी. परंतु प्रवासाचा खरा उपयोग निरीक्षणशक्ति असल्याशिवाय होत नाहीं. आणि हल्लींच्या शिक्षणानें निरीक्षण करण्याचें सामर्थ्य अथवा चौकसपणा विद्यार्थ्यांत उत्पन्न होत नाहीं; हा या शिक्षणाचा एक मोठा दोष आहे. एका संस्कृत कवीनें म्हटल्याप्रमाणें उदकांत ज्याप्रमाणें तैलबिंदू विस्तार पावतो त्याप्रमाणें प्रवासाच्या योगानें बुद्धीचा विकास होतो. म्हणून कॉलेजला सुट्टी होण्याचे वेळीं मुलांना प्रवास करण्यास प्रोफेसरांनीं प्रोत्साहन देऊन, मुलांनीं प्रवासामध्यें काय अवलोकन करावें, हें त्यांस समजावून सांगावें. एवढा विस्तार करण्याचें मुख्य कारण हें कीं कांहीं विद्यार्थ्यांमध्यें मधूनमधून प्रवास करण्याची आवड उत्पन्न झाल्याचें दिसून येतें. काश्मीरपर्यंत प्रवास केलेल्या एका स्काऊटचा हस्तलिखित प्रवासवृत्तांत आमच्या पाहण्यांत आला, त्यावरूनहि आमचा असा ग्रह झाला आहे कीं हा विद्यार्थ्यांचा प्रवास न होता, त्यांच्या सायकलीचाच प्रवास होतो. असो. रा. केळकर आणि जोशी यांचें अनुकरण करण्याची बुद्धि इतर विद्यार्थ्यांमध्यें उत्पन्न होईल अशी आम्हांस आशा आहे. मात्र आम्हांस रा. जोशी यांचा वृत्तांत वाचून दोन सूचना कराव्याशा वाटतात. परमुलखांत गेल्यावर महाराष्ट्रियांनीं उतरण्याकरितां महाराष्ट्रियांचेंच घर कधींहि शोधून काढूं नये. महाराष्ट्रियेतर माणसाकडेच शक्य तों बिऱ्हाड द्यावें. कारण त्यायोगें इतर लोकांच्या चालीरिती व स्वभाव यांचें ज्ञान आपणांस आपोआपच होतें. तसेंच प्रवास करणारांनीं दुधावर राहण्याची सवय केल्यास त्यांना कोठेंहि नडणार नाहीं, व खर्चहि कमी येईल.

---

## जाहिराती

**जयकर्नाटक** (वर्ष ८ अंक ४ माघ शुद्ध. १५ शके १८५१, कानडी मासिक, संपादक, दत्तोपंत बेंद्रे, धारवाड.)

हें कानडी मासिक निघावयास सुरवात होऊन बरेच दिवस झाले, परंतु अलिकडे रा. रा. दत्तोपंत बेंद्रे ह्यांच्या हातांत मासिकाचीं सूत्रें आल्यामुळें मासिकामध्यें पुष्कळच सुधारणा झाली आहे. हल्लीं ज्या पद्धतीवर, 'मॉडर्न रिव्ह्यू' 'रत्नाकर' 'सरस्वती' वगैरे उच्च दर्जाचीं मासिकें प्रसिद्ध होतात त्याच पद्धतीला अनुसरून हें मासिक कानडी भाषेंत प्रसिद्ध केलें जातें.

ह्या मासिकाचें बाह्यांग सुंदर असून आंतील छपाई व टापटीप वाखाणण्यासारखी आहे. त्याचप्रमाणें लेखहि उच्च दर्जाचे व प्रतिभासंपन्न (original) असून परिश्रमपूर्वक लिहिलेले असतात. तसेंच, चालू वर्षी, प्रसिद्ध बंगाली ग्रंथकार रवींद्रनाथ टागोर ह्यांच्या 'राजर्षी' कादंबरीचें भाषांतरहि प्रसिद्ध होत असतें. एकंदरीनें पाहिलें असतां, 'जय कर्नाटकाची' चांगल्या मासिकांमध्यें गणना करण्यास हरकत नाहीं. कन्नड-वाङ्मयाची सर्व दृष्टीनें प्रगति होण्यासाठीं ह्या मासिकानें चालविलेला प्रयत्न अगदीं स्तुत्य आहे.

ग. स. जोग, बेळगांव वकील.

---

# परिषदेची हानी

लिखितं सूक्तं चरितं यैर्मनीषिभिः। अद्यैवापह्रियन्ते धिक् धिक् कालस्य चेष्टितम् ॥

माघ शु ४ रविवारीं सूर्यास्ताबरोबर मराठी ग्रंथकार श्री. वासुदेव गोविंद आपटे यांस देवाज्ञा झाली हें लिहिण्यास आम्हांस अत्यंत दुःख होत आहे. वासुदेव रावजी हे साहित्यपरिषदेचे बऱ्याच वर्षे चिटणीस होते. सध्यां तर ते कार्यकारी मंडळांत होते. त्यांच्या निधनानें परिषदेचा एक निःसीम अभिमानी व कार्यकर्ता नाहींसा झाला ही परिषदेची हानी लहानसहान नाहीं. हें वर्ष एकंदरींत मराठी साहित्यसेवकांस अनिष्ट होतें असें दिसतें. कारण गेल्या म. सा. संमेलनानंतर मराठी भाषेला ओजस्वी करणारे संमेलनाचेच अध्यक्ष शिवरामपंत परांजपे निष्प्राण होऊन गेले तों त्यांच्या मागोमाग मराठ्यांच्या इतिहासावर साभिमान व चिकित्सापूर्वक लेख लिहिणारे प्रो. भानू यांचाहि अस्त झाला. आणि आतां मराठी वाङ्मयाचा विस्तार करणारे श्री. वासुदेव रावजी यांनीं आपलाच संकोच केला. अग्निमांद्याच्या विकारानें यांची प्रकृति आज कित्येक वर्षे खालावली होती तरी त्यांचें ग्रंथलेखन सारखें चालू होतें. त्यांच्या लेखणीला विश्रांती मिळून माहीत नव्हती. मरणसमयीं त्यांचें वय ६० वर्षांचें होतें.

---

दुरुस्ती

या अंकाचीं पृष्ठें ५७, ५८, ५९, ६०, ६१ व ६२ यांचीं विषयवारीचीं वरील पृष्ठें चुकीचीं पडलीं आहेत. तीं ६५, ६६, ६७, ६८, ६९, ७० अशीं घालून घ्यावीं. मराठीच्या प्राकृत भाषा हा निबंध चुकून प्र. धों. कानिटकर यांच्या नांवावर पडला आहे. तरी प्र. धों. कानिटकर यांच्या जागीं प्र. ह. खाडिलकर अशी दुरुस्ती करून घ्यावी.



अनुक्रमणिका